मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांतील

# मराठी दोलामुद्रितें

अर्थात्

मुं. म. ग्रंथसंग्रहालयांतील

इ. स. १८६७ अखेरपर्यंतच्या मराठी मुद्रित ग्रंथांची

**वर्णनात्मक नामावलि**

रा. रा. अ. का. प्रियोळकरांच्या

ग्रंथवर्णन व ग्रंथसंरक्षण या विषयावरील

प्रास्ताविक निबंधासह



मुंबई

१९५१

# पुरस्कार

मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या सुवर्णमहोत्सवाच्या निमित्तानें ही दोला-मुद्रितांची सूचि प्रकाशित होत आहे. संस्थेच्या उत्साही कार्यकर्त्यांचा पहिला विचार संस्थेंतील सर्व पुस्तकांचा एक अद्ययावत् कॅटलॉग तयार करण्याचा होता, वेळेशीं शर्यत नसती, तर हा कॅटलॉग एक भरीव व उपयुक्त संदर्भग्रंथ झाला असता, यांत शंका नाहीं, पण ही गोष्ट शक्यतेच्या बाहेर वाटली. अशा वेळीं मुंबई युनिव्हर्सिटीचे ग्रंथपाल श्रीयुत मार्शल यांनीं एक फार व्यवहार्य व आटोपशीर अशी सूचना केली. ती म्हणजे सूचिसमितीनें सबंध कॅटलॉगच्या खटाटोपांत न पडता ग्रंथसंग्रहालयांत उपलब्ध असलेल्या दोलामुद्रितांचीच फक्त सूचि तयार करावी ही होय.

सूचीचें सर्व काम ग्रंथसंग्रहालयाचे ग्रंथपाल रा. पु.ह. सहस्रबुद्धे यांनीं केलें आहे. काम फार घाईत करावें लागल्याकारणानें त्यात थोडेफार दोष राहून जाणें शक्य आहे; पण त्यांची जबाबदारी अर्थातच सूचिसमितीकडेच आहे. तरी पण समितीचा अध्यक्ष या नात्यानें हें नमूद करणें मला अवश्य वाटतें कीं, कार्यवाहांचा ( विशेषत: रा. वि. गो. फाटक यांचा ) उत्साह व ग्रंथपालांची कार्यतत्परता यांच्यामुळेंच हें कार्य सुकर झालें.

आपल्या देशांत दोलामुद्रितांचा कॅटलॉग करण्याचा हा पहिलाच प्रयत्न आहे, अशी माझी समजूत आहे. रा. शं. ग. दाते यांच्या मोठ्या सूचींत अर्थातच आद्यमुद्रितांची निराळी यादी त्यांनीं दिली आहे, पण ती विस्तारानें केलेली नाहीं. पाश्चात्य देशांतील ग्रंथालयांतील दोलामुद्रितांचे कॅटलॉग प्रसिद्ध आहेत व ते सर्वमान्य संदर्भग्रंथ म्हणून मान्यता पावले आहेत. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांतील दोलामुद्रितांची ही सूचिपण अशीच मान्यता पावो व मराठी भाषेच्या अभ्यासूंना तिचा उपयोग होवो. ही सूचि अर्थातच मराठी ग्रंथ छापण्यास सुरुवात झाली तेव्हांपासून इ. स. १८६७ अखेरपर्यंत जे मराठी ग्रंथ प्रसिद्ध झाले व अशांपैकीं जे ग्रंथ मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांत आज उपलब्ध आहेत त्यांची आहे. तंजावरची इसापनीति किंवा कॅरेचें मराठी व्याकरण अशीं प्रसिद्ध पण प्राय: अनुपलब्ध अशीं पुस्तकें जरी या सूचींत सांपडलीं नाहींत, तरी तिची एकंदर उपयुक्तता सर्वमान्य होईल. शिवाय जुन्या पुस्तकांच्या छपाईची कल्पना यावी म्हणून निरनिराळ्या प्रकारचे सात ठसे पण या पुस्तकांत समाविष्ट केलेले आहेत.

दोलामुद्रितें म्हणजे काय याविषयीं विवेचन श्री. प्रियोळकर यांनीं आपल्या प्रास्ताविक निबंधांत पृष्ठें १२-१३ वर केलेलेंच आहे. श्री. प्रियोळकराच्या

या निबंधामुळें सूचिग्रंथ अधिकच उठावदार व उपयुक्त होईल अशी आशा आहे. श्री. प्रियोळकर यांच्यासारखा अधिकारी संशोधक सूचीला प्रस्तावना-लेखक म्हणून मिळाला ही फार आनंदाची गोष्ट आहे. त्यांचें सर्वच लिखाण विद्वत्तापूर्ण, मुद्देसूद व माहितीनें भरपूर असें असतें व या सूचीला त्यांनीं लिहिलेला प्रास्ताविक निबंधही त्यांच्या नेहमीच्या व्यासंगानुरूपच आहे. सूचि व निबंध यांचा मराठी भाषेच्या विद्यार्थ्यांना व मराठी साहित्याच्या अभ्यासकांना पुष्कळ उपयोग होईल अशी सूचिसमितीला आशा आहे.

**पु. म. जोशी**
अध्यक्ष, ग्रंथसूचिसमिती,
मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय.

९–३–४९

# पुढील ग्रंथनामावलीची रचना

१ या क्रमपुस्तकांत (Catalogue) **मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालया**-मध्यें असलेले इ. स. १८६७ अखेरपर्यंतचे मुद्रित ग्रंथ कालानुक्रमानें दिलेले आहेत.

२ एकाच वर्षांत प्रसिद्ध झालेलीं मुद्रितें, ग्रंथकारांच्या नांवांच्या वर्णानुक्रमानें दिलीं आहेत.

३ ज्या मुद्रितांवर त्यांच्या कर्त्यांचीं नांवें आढळत नाहींत, ते ग्रंथ त्या मुद्रितांच्या वर्णानुक्रमानें प्रथम देऊन, नंतर इतर ग्रंथ दाखविले आहेत. अज्ञात ग्रंथकाराच्या नांवाच्या जागीं ... ... अशीं टिंबें घातलीं आहेत.

४ ग्रंथवर्णनाचा क्रम पुढीलप्रमाणें आहे :

(१) ग्रंथकाराचें नांव. (२) ग्रंथाचें नांव. (३) आवृत्ति ( मूळांत तसा उल्लेख असल्यास ). (४) प्रकाशनस्थल. (५) मुद्रणालय. (६) प्रकाशनकाल. (७) शिळाछाप असल्यास तसा उल्लेख. ( असा उल्लेख नसलेलीं मुद्रितें खिळाछाप समजावीं ). (८) पृष्ठसंख्या. (९) आकार इंचांत. (१०) शेरा.

५ एकत्र बांधलेलीं अनेक सालांतील मुद्रितें (उदा० सर्वसंग्रहांतील महाभारताचीं पर्वें ) सोयीसाठीं पहिल्या वर्षांत दाखविणें प्राप्त झालें आहे.

६ कांहीं विशेष मुद्रितांचीं यथामूल चित्रें ( Facsimiles ) पुढें दिलीं आहेत.

७ ग्रंथाच्या शेवटीं जोडलेल्या परिशिष्टांत प्रत्येक दर्शिकेंतील (Index) आंकडे मुद्रितांचे अनुक्रमांक आहेत. त्या दर्शिका पुढीलप्रमाणें:—
(१) विषयदर्शिका. (२) मुद्रणस्थलदर्शिका. (३) ग्रंथकारनामदर्शिका.

( ११३ )

श्री

यक्षप्रश्नं

वैशंपायनऋषि जन्मेजयराजास सांगतो - कोणे एकेसमई धर्मभीमअर्जुननकुळसहदेव हे पांच पांडव द्वैतवनी राहातअसतां एक ब्राह्मण येउन त्यांस बोलिला हेमहाराज माझ्या अग्निहोत्राच्या अरणी (ह्मणजे विस्तव पाडायाची लांकडें) वृक्षावर ठेविल्याहोत्या त्या एक मृग घेउन पळाला त्याचा शोध करून अरणी मला आणून द्याव्या नाहीं तर अग्निहोत्राचा भंग होतो असें ब्राह्मणाचें वचन कानांत पडतांच पांचही पांडवानी धनुष्यबाण घेउन सर्वरान शोधिलें परंतु मृगाचें ठिकाण लागलें नाहीं आणि भूकताहानेनें बहुत पीडित होउन एक्या वडाच्या वृक्षाखालीं बेसलेअसतां धर्मराजा बोलतो—नकुळा तृषेनें प्राण व्याकुळ जाला रे कोठूनतरी पाणि आण तें ऐकून नकुळ एके उंच वृक्षावर चढला आणि पाहतो तों दूर पा

णयाचें

विदुरनीति, (कुरियर प्रेस), १८२३.
मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या संग्रहीं असलेलें मुंबईंत छापलेलें सर्वांत जुनें पुस्तक.

# प्रस्तावना

## हा महाराष्ट्रभाषेचा कोश.

—

महाराष्ट्रभाषा ह्मणजे महाराष्ट्रदेशी राहणारे जे देशस्थ ब्राह्मणादिक लोक त्यांची बोलावयाची प्राकृत भाषा, तिचा कोश ह्मणजे त्याभाषेंत जे शब्द येतात त्याचा कोश. कोशशब्दाचा सामान्यतः हा अर्थ आहे की प्रसंगी प्रयोगार्थ बाहेर काढावयाचा जो अर्थ प्रधान त्याचे संग्रहाचे ठेवणें. राजकीयादि व्यवहारोपयोगी जी मोहरा, पुतळ्या, होन, रुपये, इत्यादि द्रव्ये त्याचे ठेवण जे भांडागृह त्यास जशी कोश ही संज्ञा प्रसिद्ध आहे तशी वाग्व्यवहारोपयोगी जे शब्द तत्संग्रहरूप जो ग्रंथ त्यास ही संज्ञा प्रसिद्ध आहे. राजकीयादि व्यवहारास मुख्यत्वेकरून आश्रय जसें द्रव्य त्याप्रकारें या वाग्व्यवहारास आश्रय शब्द होत. द्रव्यकोश आणि शब्दकोश याचे सर्वगोष्टींनी साधर्म्य आहे परंतु द्रव्यकोश क्षय्य आणि हा अक्षय्य एवढा मात्र याकडे विशेष आहे. याजकरितां वाग्व्यवहारकर्ता जो कोणी त्यास शब्दकोश पाहिजे ह्मणून ज्या ज्या भाषेने व्यवहार करावयाचा त्या त्या भाषेच्या कोशावर सर्वांचा आदर अवश्य असावा. यद्यपि ज्यास त्या त्या भाषांचे कोशव्याकरणाचें ज्ञान नाही त्याचाही वाग्व्यवहार चालतो खरा परंतु कोशव्याकरणाचें ज्यास ज्ञान आहे त्याचे आणि याचे वाग्व्यवहारास फार अंतर आहे. याविषयीं दृष्टांत द्रव्यवान् आणि द्रव्यहीन याचे प्रापंचिक व्यवहार. असें असतांही आजपर्यंत या भाषेवर कोश व्याकरण करावयास कोणी प्रवृत्त झाला नाही हे मनांत आणून सर्वलोकांचे कल्याणार्थ राजकार्यधुरंधर प्रजापालनैकरत ह्यानरेबल मौंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन साहेब पाश्रण आणि गवरनर यांणीं मुंबईतील शिक्षाशाळामंडळीस आज्ञा करून हा ग्रंथ बाळशास्त्री घगवे गंगाधरशास्त्री फडके, सखाराम जोशी, दाजीशास्त्री शुक्ल आणि परशुरामपंत गोडबोले यांचे हातून करावयास आरंभिला पुढें त्यांचेच हातून प्रतापसिद्ध परमकारुणिक ह्यानरेबल जनराल सिर जान मालकम साहेब बहादूर पाश्रण आणि गवरनर यांणीं शेवटास नेला

या भाषेवर आजपर्यंत कोश व्याकरणादि व्यवस्थापक कांहींच झालें नाही हा प्रथमच संस्कार आहे. हा ग्रंथ करण्याविषयीं बुद्धीस आधार मिळून लोकांचा वाग्व्यवहार तो तरी एकरूप आहे असें नाहीं देशपरत्वें जातिपरत्वें किंबहुना व्यक्तिपरत्वें ही भिन्न भिन्न आहे अशा आधारा केवळानें जी रचना.

पंडितमंडळाचा म्हणून प्रसिद्ध असलेला पहिला मराठी कोश, १८२९.

श्री

## बीज गणित

### व्याख्या आणि लिहिण्याची परिपाटी

१ बीज गणित ह्मणजे त्या त्या सख्याचे अंकावाचून अक्षरचिन्हे करून च गणित करण्याची विद्या ही गणित करण्याची सामान्य रीति आहे

२ या विद्ये मध्ये सर्व पदार्थ जातीचे सख्याचे स्थानी अक्षरें योजितात त्या संगाती जीं कामे करायाचीं आहेत जसे मिळवणी वजाबाकी इत्यादिक. ती सर्व कित्येक स्वल्परूप कार्यप्रकाशक चिन्हे करून होतात

३ बीजगणिताचे उदाहरणा मध्यें कित्येक पदे व्यक्त ह्मणजे ठाउक किंवा सागीतलीं आहेत तास भास्कराचार्याचे बीज गणितात रूप ह्मटले आहे आणि जीं दुसरीं पदें अव्यक्त ह्मणजें ठाउक किंवा सांगीतलीं नाहींत त्यास त्याच आचार्यांचे बीज गणितात यावत तावत इत्यादिक नावे दिलीं आहेत इंग्रेजी रीतींत व्यक्त संख्या दाखवायास मूळ लिपींच आरंभींचीं अबक इत्यादिक अक्षरे घेतात आणि अव्यक्त सख्या दाखवायास मूळ लिपीचे शेवटील क्षयज्ञ इत्यादिक अक्षरें घेतात

४ कामें दाखविणारी चिंन्हें आहेत त्यांस कार्यप्रकाशक चिन्हें ह्मणतात तीं लिहितो

**शिक्षामाला, १८२७.** शिलामुद्रित एक जुनें पुस्तक. १८२५ सालच्या सुमारास शिळाछापखाना मुंबईत स्थापन झाला.

# मराठीभाषेचें व्याकरण.

---

व्याकरण ह्मणजे एक शास्त्र आहे, जेणेंकरून भाषेचें मर्मज्ञान होतें; ह्मणजे शुद्ध कोणतें आणि अशुद्ध कोणतें हें कळतें.

यावरून कोणी पुसेल कीं काय व्याकरण जाणल्याविना शुद्ध बोलतां येत नाहीं, तर याचें उत्तर असें आहे कीं, आपली भाषा शुद्ध येण्यास जरीं व्याकरणाचें विशेष अगत्य नाहीं, तरीं जो त्याजविषयीं अज्ञान, तो यद्यपि बहुवक्ता आहे, आणि जरी स्वतां अशुद्ध बोलत नाहीं, तथापि दुसऱ्यानें बोललें असतां त्यास तें शुद्ध कीं अशुद्ध हें नीट प्रतिपादितां येत नाहीं, त्यावेळेस तो गोंधळांत पडतो, तुह्मीच पहा कीं ज्या कोणास व्याकरण माहीत नाहीं, त्यास जर त्याचे भाषेंत एकादें अशुद्ध वाक्य ह्मणून दाखविलें आणि विचारिलें कीं हें शुद्ध आहे कीं अशुद्ध आहे, तर तो अशुद्ध ह्मणोन सांगेल, परंतु "का अशुद्ध?" ह्मणोन त्यास कोणी प्रश्न केला असतां त्याच्यानें त्या पृच्छकाचें समाधान करवणार नाहीं; घटकाभर पाहा, ज्याची स्वभाषा मराठी आहे, परंतु ज्यास व्याकरण ह्मणोन काय

वस्तु

रा. ब. दादोबा पांडुरंग तर्खडकर यांच्या सुप्रसिद्ध मोठ्या व्याकरणाचें पहिलें मुद्रण, १८३६.

श्री

# ज्ञानचंद्रोदय

ग्रंथ १ | कार्तिकमास शके १७६२ | कागद १



कृष्णलिलामृत अध्याय १-२-३-एकूण ओव्या एकंदर ३४४

या ज्ञानचंद्रोदयाचा कर्त्ता पांडुरंगबापूजोशी पावसकर असे परंतु कागद पेहोचिवणे व पावतीवर सई करणे हा सर्व अखत्यार गणपत कृष्णाजी यास दिल्हा असे ठिकाण बोरी बंदरचे लैनी नजीक. गावांत जुनी जांवळी मशीदीची आळी॥



मुंबईत गणपत कृष्णाजी यांचे छापखान्यात छापिला

मुंबई म. ग्रंथसंग्रहालय.च्या सग्रहीं असलेलें सर्वांत जुने मराठी मासिक, इ स. १८४०.

# प्रस्तावना

मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय या संस्थेची स्थापना १८९८ सालीं झाली. दुसऱ्याच वर्षी म्हणजे १८९९ सालीं या संग्रहालयांतील "पुस्तकांची यादी" छापून निघाली. या यादीचा आकार खिशांत मावण्याजोगा ४·७"×३" असा होता. प्रत्येक पृष्ठावर दोन स्तंभांमध्यें पुस्तकांचीं नांवें दिलीं होतीं. लेखक, संपादक किंवा प्रकाशक यांचें नांव क्वचितच पुस्तकाच्या नांवांपुढें कंसांत आढळे. कवितेच्या वर्गामध्यें १३६ या अनुक्रमांकाखालीं "आदिपर्व, सभापर्व, वनपर्व आणि विराटपर्व" अशी नोंद सांपडते; पण त्यांचा कर्ता मुक्तेश्वर मोरोपंत, विष्णुदासनामा कीं, अन्य कोण हें कळण्यास मार्ग नाहीं ! मग मुद्रामंदिर, काल, स्थल, पृष्ठें, आकार वगैरे वर्णनात्मक गोष्टी नसल्या तर नवल कसलें ? या यादीच्या कर्त्याला पद्धतशीर कॅटलॉगच्या रचनेची कल्पना असण्यास साधन नव्हतें, असें म्हणवत नाहीं; कारण यापूर्वी असे प्रयत्न मुंबईंतच झाले होते. त्यांचा आदर्श पुढें ठेवतां आला असता. उदा० रॉयल एशियाटिक सोसायटीचे मुंबई शाखेचे दोन कॅटलॉग १८६३ व १८७५ सालीं निघालेले होते. याच्याही पूर्वी या संग्रहाचे दोन कॅटलॉग १८३४ व १८३७ सालीं प्रसिद्ध झाले होते, असें ईस्ट इंडिया कंपनीच्या कॅटलॉगवरून दिसतें; परंतु त्यांच्या प्रती मुंबई शाखेंतच उपलब्ध नाहींत. मुंबईच्या नेटिव जनरल लायब्ररीचे कॅटलॉगही १८७० व १८९७ सालीं प्रसिद्ध झालेले

## मुंबईमराठीग्रंथसंग्रहालयांतील पुस्तकांची यादी.

### १ अध्यात्म.

| | |
|---|---|
| १ ज्ञानेश्वरी. (कुंटे.) | ११ गीता-ज्ञानेश्वरीरहस्य. |
| २ श्रीमद्गणेशगीता. | १२ आत्मविचार. |
| ३ गीतासारोद्धार. | १३ सार्थ पांडवगीता. |
| ४ आत्मबोध ( शंकराचार्यकृत ). | १४ ज्ञानसागर. |
| ५ ऐतरेयोपनिषद्. | १५ पूर्णसार. |
| ६ वेदोक्तमानवधर्मसार. | १६ परमामृत. |
| ७ आनंदलहरी. | १७ आत्मबोध. |
| ८ ज्ञानेश्वरी. (सोहनी.) | १८ वेदांतसार. |
| ९ दासबोध. | १९ नित्यानित्यविवेक |
| १० योगवासिष्ठ प्रकरणें १ व २. | २० विचारसागर. |
| | २१ भाषाविवृत्तिसहित गीता.* |

१८९९ ची पुस्तकांची यादी मूळ आकारांत.

आढळतात. याशिवाय सर अलेक्झांडर ग्रँट यांचे १८६६ व १८६७ मध्यें व मि. जे. बी. पील ( J. B. Peile ) यांचा १८६९ मध्यें असे प्रसिद्ध झालेले मुंबई इलाख्यांतील देशी प्रकाशनांचे कॅटलॉग होतेच. त्यांवरून ग्रंथनामावलीच्या रचनेची साधारण कल्पना सहज करतां येण्यासारखी होती.

## कॅटलॉग म्हणजे काय

ग्रंथांची यादी किंवा नामावलि हा शब्द इंग्रजी कॅटलॉगाचा मराठी प्रतिशब्द म्हणून आम्ही योजतों. *Cata* ( Complete ) *logos* ( word, discourse ) असे Catalogue या शब्दाचे मूळ ग्रीक अवयव आहेत. प्रथम लॅटिन व नंतर फ्रेंच भाषेच्या द्वारा हा शब्द इंग्रजीमध्यें १४६० च्या सुमारास आला. त्या वेळीं a list, register or complete enumeration या अर्थी हा शब्द प्रथम वापरण्यांत येत असे. १६६७ सालापासून अलीकडे त्याला a list or enumeration systematically arranged in alphabetical or other order, often with the addition of brief particulars असा अर्थ प्राप्त झाला आहे. एकादा कॅटलॉग तयार करावयाचा म्हटल्यावर आपणाकडून काय अपेक्षा असते हें यावरून कळून येईल. वरील वर्णनानुरूप युरोपामध्यें अनेक ग्रंथ-नामावल्या जुन्या काळीं प्रसिद्ध झाल्या; परंतु कॅटलॉगचें स्वरूप कसें असावें, याविषयीं शास्त्रशुद्ध आंखणी फारशी कोणी केली नव्हती. १८३४ सालीं ब्रिटिश म्युझियमच्या विश्वस्तांना आपल्या ग्रंथसंग्रहाचा कॅटलॉग छापून काढण्याची इच्छा झाली. तेव्हां तो कसा तयार करावा यासंबंधीं योजना पुढें ठेवण्याबद्दल मुद्रितग्रंथ-विभागाचे अधिकारी बेबर ( H. H. Baber ) यांना सांगण्यांत आलें. त्यांनीं आपलें निवेदन लगेच सादर केलें, परंतु संपूर्ण कॅटलॉग तयार झाल्याखेरीज त्याचा कोणताही भाग मुद्रणाकरितां पाठवायचा नाहीं, असा त्यांचा आग्रह होता. कॅट-लॉगच्या रचनेसंबंधींचा खल १८३८ च्या अखेरपर्यंत ग्रंथाधिकारी व विश्वस्त यांच्यामध्यें चालला होता. बेबर सेवानिवृत्त होऊन त्यांच्या जागीं पॅनिझी ( A. Panizzi ) यांची योजना झाली. संपूर्ण कॅटलॉग तयार झाल्या-खेरीज छापखान्याकडे धांव घ्यावयाची नाहीं, असें त्यांचेंही मत होतें. पुढें १८३९ सालीं पॅनिझी यांनीं वुइंटर जोन्स ( Winter Jones ) वगैरे आपल्या सह-कार्‍यांच्या साहाय्यानें कॅटलॉग कसा असावा, यासंबंधीं ९१ कलमाची एक स्मृति

तयार केली. ग्रंथनामावलिरचनेच्या इतिहासांत ही मोठीच क्रांति मानली जाते, व यामुळें युरोपांतील कॅटलॉगच्या रचनेला नवें वळण व उठाव मिळाला असें म्हणतात.

## मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाचे कॅटलॉग

मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांतील ग्रंथांच्या १८९९ सालच्या यादीच्या कर्त्यांना या पूर्वप्रयत्नांची माहिती होती, असें मी समजत नाहीं. परंतु ती नसतांही जास्त निर्दोष व पूर्ण ग्रंथनामावलि तयार करणें त्यास शक्य होतें. उत्साहातिरेकामुळें शक्य तितकी लवकर यादी छापलेली पाहण्याच्या घाईत ही अपूर्णता राहिलेली दिसते. परंतु याहीपेक्षां, थोडक्या पैशांत यादी छापून काढण्याचें काटकसरीचें धोरणच या अपूर्णतेच्या मूळाशीं असणें जास्त संभवनीय आहे. आज रस्त्यावरचा एकादा सामान्य फेरीवालादेखील चारदोन आणे सहज टाकून वृत्तपत्र विकत घेतो; परंतु पन्नास वर्षांमागें एक आणा देऊन ही ग्रंथांची संग्रहणीय यादी विकत घेणें त्या काळच्या प्रतिष्ठित वाचकाला देखील भारीच जड वाटलें असावें ! कसेंही असो, मला तर ही पुस्तकांची छोटी यादी पाहून मोठीच मौज वाटली. १७८७ सालीं ब्रिटिश म्युझियमचा असाच दोन भागांत एक कॅटलॉग मुद्रित झाला होता. त्यासंबंधीं डॉ. गार्नेट ( Dr. Richard H. Garnett ) यानें काढलेले उद्गार याही आपल्या यादीला लागू होण्यासारखे आहेत. तो लिहितो, " If they had tried to do more they would probably have done nothing. Their list, meagre in every sense, and at the present day less interesting for what it contains than for what it does not contain, served for twenty years"...

१८९९ सालची मुं. म. ग्रं. सं. ग्रंथांची यादी रद्द करून १९०५ सालीं दुसरा नवा " क्याटलाग " तयार करण्यांत आला. यांतील सुधारणा म्हणजे पुस्तकांचीं नांवें वर्णानुक्रमवार दिलेलीं आहेत. तसेंच लेखक–प्रकाशकांचीं, कांहीं अपवाद सोडून, उपनांवें तेवढीं देण्यांत आलीं आहेत. त्यांत व्यक्तिनामें किंवा पितृनामें आढळत नाहींत. हा क्याटलाग मुद्रित होत असतां व प्रकाशनाच्या पूर्वी जीं कांहीं नवीं पुस्तकें संगृहीत झालीं त्यांचाही परिशिष्ट १ मध्यें समावेश केला आहे. याचें दुसरें परिशिष्ट ( २–३ ) १९०८ सालीं, व तिसरें ( ३–४ ) १९१२ सालीं निघालें.

पुढें संग्रहालयांत ग्रंथांची जसजशी आणखी भर पडूं लागली, तसतशी नवी यादी तयार करण्याची आवश्यकता भासूं लागली. त्यामुळें १९०५ सालचा

कॅटलॉग व त्याचीं परिशिष्टें रद्द करून १९२४ अखेरपर्यंतच्या पुस्तकांची एक नवीच यादी १९२६ सालीं प्रसिद्ध करण्यांत आली. यांत पुनः पुस्तकें वर्णानुक्रमें लावून १९१२ च्या जुन्या कॅटलॉगच्या परिशिष्टांत सुरू केलेली संपूर्ण नांव देण्याची पद्धति सर्वत्र अमलांत आणण्यांत आली आहे व शेवटीं ग्रंथकारांची वर्णानुक्रमवार दर्शिका ( Index ) जोडिली आहे. ही यादी संस्थेचे एक उत्पादक कै. नारायण महादेव बाक्रे यांनीं कांहीं स्वयंसेवकांच्या साहाय्यानें तयार केली. या यादीच्या आरंभीं संस्थेचे एक संस्थापक व त्या काळचे कार्यवाह कै. अं. गो. पुणतांबेकर यांच्या सहीनें जे **खुलाशाचे दोन शब्द** छापले आहेत, त्यांत ते लिहितात, " या यादीची पहिली आवृत्ति १८९९ सालीं प्रसिद्ध करण्यांत आली. त्यानंतर संग्रहालयांत जसजशीं पुस्तकें जमत चाललीं, तशीं सवडीप्रमाणें चार परिशिष्टें काढण्यांत आलीं." वास्तविक वर सांगितल्याप्रमाणें १८९९ ची यादी अजिबात रद्द करून १९०५ सालीं नवाच क्याटलाग तयार करण्यांत आला, असा खरा प्रकार आहे. दरवर्षी वार्षिक वृत्तांतामध्यें वृत्तांतविषयक वर्षी संगृहीत नवीं पुस्तकें म्हणून परिशिष्टामध्यें अशा पुस्तकांचीं नांवें देण्याचा कांहीं वर्षे मुंबई म. ग्रंथसंग्रहालयाचा प्रघात होता. १९३८–१९३९ आणि १९४०-१९४१ या वर्षांच्या स्वतंत्र याद्या छापलेल्या उपलब्ध आहेत.

## मराठींतील पहिली ग्रंथनामावलि

मुं. म. ग्रं. सं. ची १८९९ ची यादी ही मराठी भाषेंत मुद्रित ग्रंथसंग्रहाची पहिली यादी नाहीं. याहीपूर्वी शके १७८१ ( इ. स. १८५९ ) सालीं शामराव मोरोजी यांनीं प्रसिद्ध केलेल्या " ग्रंथालय या नांवें करून पुस्तकांची नामवही " या पुस्तकाचा येथें अवश्य उल्लेख केला पाहिजे. याचीं ९४+२ पृष्ठें असून आकार ६·२"×४·२" आहे. त्यांत संस्कृत, मराठी, हिंदुस्थानी व गुजराती अशा भाषांतीलही प्राचीन अमुद्रित ग्रंथांची यादी आहे. आधुनिक मुद्रित ग्रंथांचा त्यांत नामनिर्देश नाहीं. एका वर्षापूर्वी मला याची एक प्रत मिळाली. अलीकडे आणखी एक प्रत उपलब्ध झाली आहे. दुसरा मराठी ग्रंथनामावलीचा एक उल्लेखनीय प्रयत्न म्हणजे १८९० सालीं मुद्रित झालेलें श्रीमंत संपतराव गायकवाड यांच्या श्रीसयाजी पुस्तकालयाचें मराठी पुस्तकांचें "**क्रमपत्रक**" होय. यांत नामानुक्रम व वर्गानुक्रम दिले आहेत. प्रकाशनाचें वर्ष, पृष्ठसंख्या, आकार, वगैरे माहिती नाहीं. पण जें काय दिलें आहे तें बिनचूक आहे, हा या पुस्तकाचा विशेष

होय. क्याटलागबद्दल **क्रमपत्रक** हें नांव भाषाशुद्धीचा जुन्या काळचा एक प्रयत्न म्हणून कौतुक वाटतें. यावरून **क्रमपुस्तक** असा शब्द क्याटलागबद्दल योजावा अशी माझी सूचना आहे.

१९२६ सालीं छापलेल्या मुं. म. ग्रं. सं. यादीचीं पुस्तकें केव्हांच संपलीं. तेव्हां आपला संग्रह पुनः अद्ययावत् शास्त्रीय पद्धतीनें लावून त्याची व्यवस्थित नामावलि प्रसिद्ध करण्याचा विचार संग्रहालयाच्या चालकांपुढें उभा राहिला. आज डयुईची दशांशपद्धति व डॉ. रंगनाथनची द्विबिंदुपद्धति अशा दोन वर्गीकरणपद्धति प्रामुख्यानें लोकांपुढें आहेत. यांपैकीं जास्त चांगली कोणती यासंबंधीं तज्ज्ञांमध्येंही एकवाक्यता नाहीं. कांहीं डयुईच्या पद्धतीचे पुरस्कर्ते आहेत. तसे दुसरे डॉ. रंगनाथनच्या पद्धतीचे आहेत. डॉ. रंगनाथनची पद्धति देशी ग्रंथांना जास्त उपयोगी अशा मताचें एके काळीं प्राबल्य होऊन त्या पद्धतीनें वर्गीकरण करणारा एक तज्ज्ञही सांपडल्यामुळें त्या पद्धतीप्रमाणें मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांतील ग्रंथ लावण्याची सुरुवातही झाली. परंतु दुर्दैवानें हें काम त्यांना पुरें करतां आलें नाहीं. डयुईपद्धतीप्रमाणें रा. शंकर गणेश दाते यांनीं आपल्या सूचीचें वर्गीकरण दशांशपद्धतीनें केलेलें आहे. मुंबई विद्यापीठाच्या ग्रंथालयशास्त्राच्या वर्गामध्येंही हीच पद्धति स्वीकारलेली आहे. तेव्हां डयुईच्या पद्धतीप्रमाणें पुस्तकें लावणें जास्त सुकर होईल, हें नवें मत पुढें आलें. याकरितां मुंबई सरकारच्या दप्तरखात्याचे डायरेक्टर डॉ. पु. म. जोशी यांच्या अध्यक्षतेखालीं ग्रंथालयशास्त्रविशारदांची एक खास ग्रंथसूचिसमितीही नेमण्यांत आली. ही ग्रंथनामावलि सुवर्णमहोत्सवाच्या वेळींच प्रसिद्ध व्हावी, निदान तिचा आरंभींचा कांहीं भाग तरी मुद्रित व्हावा, अशी संग्रहालयाच्या व्यवस्थापक मंडळाची फार फार इच्छा होती; परंतु ही गोष्ट व्यवहार्य नव्हती. तेव्हां निदान दुर्मिळ ग्रंथांची यादी तरी यावेळीं प्रसिद्ध करावी, अशी एक सूचना मुंबई विद्यापीठाचे मुख्य ग्रंथाधिकारी श्रीयुत मार्शल यांनीं पुढें आणली आणि तिचेंच फल म्हणजे प्रस्तुत दुर्मिळ ग्रंथांची नामावलि होय.

## दुर्मिळ ग्रंथ कशास म्हणावें

—पण दुर्मिळ ग्रंथ म्हणजे काय? कांहीं वर्षांमागें अमुक ग्रंथ कित्येक दिवस शोधतों आहें, पण आपल्याला कोठें मिळतच नाहीं, असें एक स्नेही माझ्याशीं बोलले. हा ग्रंथ मुद्रणातीत ( out of print ) झालेला नाहीं, हें मला माहीत होतें. पुढें कांहीं दिवसांनीं एका पुस्तकाच्या दुकानांत गेल्यावेळीं

दुकानदाराला सहज विचारतां तो ग्रंथ आपल्याजवळ विकावयास असल्याचें त्यानें मला सांगितलें. माझ्या उपरिनिर्दिष्ट स्नेह्याला न मिळणारी गोष्ट मिळवून देऊन त्याच्यावर मोठीच मेहरबानी करण्याच्या बुद्धीनें मीं तो तात्काळ विकत घेतला व त्या गृहस्थाला नेऊन दिला. पण त्याला ग्रंथ मिळाल्याबद्दल आनंद न होतां उलट त्यानें तोंड आंबट केलें! त्याला पैसे देऊन तो ग्रंथ नको होता! मी विकत आणलाच म्हणून त्यानें कष्टानें त्याचे पैसे दिले! दुर्मिळ म्हणजे दुःखानें-कष्टानें मिळणारा! त्याच्या दृष्टीनें हा ग्रंथ दुर्मिळ होता. पण अशा ग्रंथाला आम्हीं दुर्मिळ म्हणत नाहीं. अगदीं अलीकडे प्रसिद्ध झालेला ग्रंथही मुद्रित प्रती संपल्यामुळें दुर्मिळ होतो. असा मुद्रणातीत ( out of print ) ग्रंथ म्हणजे दुर्मिळ ग्रंथ नव्हे. दुर्मिळ हा शब्द इंग्रजी rare या शब्दाचा मराठी प्रतिशब्द म्हणून आम्हीं वापरतों. क्वचित्–विरळ आढळणारा ( seldom found ) असा त्याचा अर्थ. एकादा ग्रंथ जरी विकत न मिळाला तरी जर त्याच्या पुष्कळशा प्रती सार्वजनिक किंवा वैयक्तिक ग्रंथसंग्रहांत असतील, तर तो ग्रंथ दुर्मिळ म्हणतां येत नाहीं. अर्थात् दुर्मिळ हा शब्दसंकेत ( term ) तुलनात्मक आहे. एकादा ग्रंथ दुर्मिळ आहे किंवा नाहीं हें ठरण्यास सतत त्याची गवेषणा किंवा शोध झाला पाहिजे. युरोप किंवा अमेरिका येथें अनेक संग्राहक व ग्रंथविक्रेते गेले चारपांच शतकें ग्रंथांचा शोध करीत आहेत. त्यामुळें तिकडे दुर्मिळ कोणत्या ग्रंथास म्हणावें हें ठरविणें शक्य आहे. डेव्हिड क्लेमेंट ( David Clement ) नांवाचा सतराव्या शतकांतील एक फ्रेंच ग्रंथशास्त्रज्ञ म्हणतो, " A book which is difficult to find in the country where it is sought ought to be called simply *rare*; a book which is difficult to find in any country may be called *very rare*; a book of which there are only fifty or sixty copies existing, or which appears so seldom as to suggest that there never had been more at any time than that number of copies, ranks as *extremely rare*; and when the whole number of copies does not exceed ten, this constitutes *excessive rarity*, or *rarity in the highest degree*." मि. बर्टन यानें एका शतकानंतर या दुर्मिळ ग्रंथाच्या वर्गीकरणाला पोकळ विद्वत्ताप्रदर्शन म्हणून नाक मुरडलें. बर्टन लिहितो, " Books may be rare enough

in the real or objective sense of the term, but if they are not so in the nominal or subjective sense, by being sought after, rarity goes for nothing. A volume may be unique—may stand quite alone in the world—but whether it is so, or one of a numerous family, is never known, for no one has ever desired to possess it."

दुर्मिळतेसंबंधीं पाश्चात्यांच्या काय समजुती आहेत, याची साधारण कल्पना वरील उताऱ्यांवरून होईल. आतां आपल्याकडील दुर्मिळ मुद्रित मराठी ग्रंथांचें एक ठोकळ वर्गीकरण करूं :

१ जे ग्रंथ मुद्रित झाल्याचे ठाम उल्लेख सांपडतात, परंतु ज्यांचा जगांत कोठेंच थांग लागलेला नाहीं असे. फादर स्टिफन्सच्या पुराणाच्या १६१६, १६४९ व १६५४ सालच्या मुद्रित प्रती, शालापद्धति, बैठक चावडी (१८५६) वगैरे अनेक मराठी ग्रंथ आहेत कीं, त्यांची एकही प्रत कुठेंच पाहावयास देखील मिळत नाहीं. अशा दुर्मिळ ग्रंथांस **अप्राप्त** असें नांव देऊं. दुर्मिळ ग्रंथांचा हा पहिला वर्ग.

२ ज्या मराठी ग्रंथाची एकच प्रत ज्ञात आहे, त्याला **अनन्य** (unique) म्हणतां येईल. उदाहरणार्थ, पोर्तुगालच्या बिब्लिओतेकमध्यें असलेलें सेंट ॲंथनीचें पुराण (१६५८) या वर्गात घालतां येईल.

३ ज्याच्या सर्व जगांत मिळून दहाच्यावर प्रती नसतील, अशा ग्रंथाला **अत्यंत दुर्मिळ** म्हणतां येईल.

४ ज्या ग्रंथाच्या पन्नाससाठांपेक्षां जास्त प्रती नाहींत, त्या ग्रंथांना **फार दुर्मिळ**, आणि—

५ ज्याच्या यापेक्षां जास्त प्रती असतील, परंतु सामान्यपणें जो मिळत नाहीं, त्याला **दुर्मिळ** असें साधें नांव द्यावयास हरकत नाहीं. पहिल्या वर्गातील ग्रंथ पुढेंमागें एकादी प्रत मिळाल्यास दुसऱ्या वर्गात येईल. ह्याचप्रमाणें दुसऱ्या वर्गात मोडणारा ग्रंथ आणखी एकादी प्रत मिळाल्यास तिसऱ्या वर्गात घालावा लागेल. इतकेंच नव्हे, तर अगदीं पहिल्या वर्गातील ग्रंथाच्या पन्नास साठ किंवा शें–दीडशें प्रतींचा सांठा एकाएकीं सांपडून तो अगदीं खालच्या वर्गात जाणेंही अशक्य नाहीं.

हंसांचा वामनावरील निबंध मी एके काळीं फार दुर्मिळ समजत होतों. कित्येक वर्षें शोध करूनही मला त्याची प्रत मिळाली नव्हती. एके दिवशीं

गिरगांवांतील फूटपाथवर त्याच्या पांचपन्नास प्रती प्रत्येकीं चार आणे किंमतीला विकण्याकरितां पडलेल्या मला आढळल्या! अशा प्रकारें कोणत्याही ग्रंथाची दुर्मिळता एकदम नष्ट होणें शक्य आहे. कारण जुन्या पुस्तकांचा युरोप किंवा अमेरिका येथें जसा कसून तपास होतो व पद्धतशीर विक्रीचा धंदा चालतो, तसा आपल्याकडे प्रकार नाहीं. आपल्याकडे दुर्मिळ पुस्तकांचा बाजार, कांहीं अपवाद सोडल्यास, सध्यां मोडतोडीचे जरीपुराणा मालाचे फेरीवाले व रद्दीवाले यांच्याच नियंत्रणाखालीं आहे! कितीं अमोल दुर्मिळ ग्रंथांचा पिंजर किंवा चणे–फुटाणे यांच्या पुड्या बांधण्यास किंवा कागदाचा रांधा करण्याच्या कामीं उपयोग होत असेल, हें केवळ एक परमेश्वरच जाणें!

## ग्रंथ दुर्मिळ होण्याचीं कारणें

एकादा ग्रंथ दुर्मिळ कां होतो, याचाही येथें विचार करणें मनोरंजक होईल. युरोपामध्यें कांहीं पुस्तकें जुन्या काळीं कातड्यावर ( vellum ) छापिलीं जात. कातडें हें कागदासारखें स्वस्त व सुलभ नसल्यामुळें त्यांच्या ठराविकच प्रती छापीत. शिवाय त्या काळीं आजच्या सारखा प्रचंड वाचकवर्ग नसे. युरोपमध्यें पंधराव्या शतकांत प्रत्येक ग्रंथाच्या कागदावरील प्रती देखील तीनशेंपेक्षां जास्त छापीत नसत असें म्हणतात. त्या मानानें पाहतां आपल्याकडे मुद्रणाच्या आरंभकालीं म्हणजे एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं जास्त प्रती छापल्या जात, असें दिसतें. १८३२ च्या सुमारास मुंबईच्या नेटिव एज्युकेशन सोसायटीनें प्रसिद्ध केलेल्या कांहीं ग्रंथांच्या किती प्रती छापल्या गेल्या तें पाहा—

| | | | | |
|---|---|---|---|---|
| सारसंग्रह | पृष्ठें | १४० | प्रती | १००० |
| बोधकथा | ,, | ७८ | ,, | २००० |
| भूगोल विषयक संग्रह | ,, | २५६ | ,, | १००० |
| पंचोपाख्यान | ,, | १३८ | ,, | १००० |
| बोधवचनें | ,, | ७२ | ,, | १००० |
| इंग्लंड देशाची बखर | ,, | ४७६ | ,, | १००० |
| इसापनीतिकथा | ,, | ३३० | ,, | १००० |
| बाळगोष्टी | ,, | ४० | ,, | १००० |
| बाळमित्र ( भा. २ रा ) | ,, | ४१४ | ,, | १००० |
| पदार्थविज्ञान शास्त्र | ,, | ५७८ | ,, | ५०० |

मोल्स्वर्थच्या मराठी-इंग्रजी कोशाच्या १८३१ सालच्या पहिल्या एडिशनच्या एकंदर १०१६ प्रती मुद्रित केल्या होत्या. दादोबा पांडुरंग यांनीं आपल्या १८३६

सालच्या मराठी व्याकरणाच्या ७०० प्रती छापल्या होत्या. यावरून त्या काळीं पुस्तकाच्या किती प्रती छापीत याची साधारण कल्पना होईल. एखाद्या पुस्तकाच्या कितीही प्रती छापल्या, तरी त्या विशेषतः निष्काळजीपणानें हाताळल्यामुळें हळूहळू खराब व नष्ट होतात. ज्यांना हलका कागद वापरलेला असतो त्या ग्रंथांचें आयुष्य लवकर संपुष्टांत येतें. एखादी प्रत उपयोग न करितां पडून असली, म्हणजे ती तेवढी टिकून राहते. पण तिच्या कागदाची स्थिति भाजलेल्या पापडासारखी ठिसूळ होते. जरा कोठें धक्का बसला कीं तुकडा पडतो. उपरिनिर्दिष्ट मोल्वर्स्थच्या मराठी कोशाच्या एक हजार आणि सोळा प्रती छापल्या, परंतु त्यांपैकीं परवांच एक प्रत मला पाहावयास मिळाली. दुर्मिळतेच्या **अनन्य** वर्गांत जरी हा ग्रंथ घालतां आला नाहीं, तरी तो **अत्यंत दुर्मिळ** आहे, यांत शंका नाहीं. त्याचा कागद वाईट आहे हें त्याच्या कमी प्रती सांपडण्याचें एक कारण आहे. याशिवाय या कोशाची एकदम सुधारून वाढविलेली १८५७ सालची नवी दुसरी आवृत्ति निघाल्यामुळें पहिल्या आवृत्तीची उपयुक्तता व महत्त्व कमी झालें व लोकांनीं तिची हेळसांड व नाश केला, असेंच दिसतें. एखाद्या पुस्तकाचा टिकाऊपणा त्याच्या वाचकवर्गाच्या स्वभावप्रकृतीवरही अवलंबून असतो. शाळेंतील निष्काळजी मुलांच्या हातांत पडणारीं क्रमिक पुस्तकें किंवा अडाणी लोकांच्या उपयोगांत येणारीं धार्मिक चोपडीं लवकर खराब होतात. अशा प्रकारचीं पुस्तकें लवकर नष्ट होतात त्याला आणखीही एक कारण असतें. तीं लहान असून त्यांची बांधणी कागदी पातळ कव्हराची असते. " महापुरें वृक्ष जाती तेथें लव्हाळे वांचती " याच्या अगदीं उलट प्रकार पुस्तकांच्या बाबतींत असतो. जाड पुठ्ठयाची बांधणी असलेलीं लठ्ठ पुस्तकें पुष्कळ दिवस टिकतात; लहान चोपडीं लौकर नष्ट होतात. ज्याप्रमाणें रानांत पडलेलें झाडाचें भलें मोठें खोड झंझावाताला तोंड देऊन राहातें, व पाचोळा कुठल्याकुठें उडून जातो, त्याप्रमाणें या चोपड्यांची स्थिति असते असें म्हणावयास हरकत नाहीं. असें जर नसतें, तर शनिमाहात्म्य, लघु-व्याकरण, मनाचे श्लोक, मेळ्याचीं पदें, प्रभात फेरीचीं गाणीं, कँडीचीं पाठ्य पुस्तकें, संसारचोपडी, अशा सारख्या लाखों प्रतींच्या अनेक आवृत्त्या ज्या पुस्तकांच्या निघाल्या, त्यांच्या जुन्या प्रती आज आपणास पाहावयास मिळाल्या नसत्या काय ? एखाद्या पुस्तकाची नवी आवृत्ति निघाली, म्हणजे जुनी आवृत्ति फेकून द्यावयाची याही मूर्ख संवयीमुळें पुष्कळशीं जुनीं पुस्तकें दुर्मिळ झालीं आहेत. निदान

ग्रंथसंग्रहालयांनीं तरी अशी नासाडी करूं नये. पुस्तकाची प्रत्येक आवृत्ति हें स्वतंत्र पुस्तक समजून तें रक्षणीय व संग्रहणीय मानिलें पाहिजे. ग्रंथांच्या स्वाभाविक नाशाचीं हीं लक्षणें झालीं. परंतु मनुष्याच्या आकस्मिक मरणाला ज्या प्रमाणें प्लेग, पटकीसारख्या व्याधि किंवा व्याघ्र, सिंह सारखे पशु किंवा अन्य अपघात कारणीभूत होतात, त्याप्रमाणें पुस्तकाचा नाश घडवून आणणारे त्याचे शत्रु असतात. खलिफा उमर यानें केलेल्या अलेक्झांड्रिया येथील ग्रंथसंग्रहाच्या नाशाची आख्यायिका प्रसिद्ध आहे. सहा महिने त्याच्या सैन्याच्या स्नानगृहांतील सरपणाची गरज हा ग्रंथसंग्रह भागवीत होता असें म्हणतात ! आपल्याकडे मुसलमानांच्या व पोर्तुगीजांच्या धर्मवेडाला अनेक ग्रंथ बळी पडले याबद्दल पुरावे आहेत. पण ते ग्रंथ हस्तलिखित. अलीकडे इंग्रजी सरकारच्या कोपाला बळी पडून पुष्कळ मुद्रित ग्रंथ नष्ट झाले त्यांची गणती आतां निर्भयपणें करतां येण्यासारखी आहे. मि. ब्लेड्स् (Mr. Blades) नांवाच्या लेखकानें ग्रंथशत्रूंच्या यादींत, आग, पाणी, गॅस आणि उष्णता, धूळ आणि हेळसांड, कसर वाळवीसारखे जीवजंतू, बुक बाइंडर आणि संग्राहक ( collectors ) यांचा समावेश केलेला आहे. संग्राहकांचा ग्रंथशत्रूंत समावेश करण्याचें कारण ग्रंथांतील चित्रें किंवा अर्पणपत्रिका अशा प्रकारच्या विशिष्ट भागांचा संग्रह करण्याचा ज्यांना नाद आहे असे संग्राहक हे भाग त्यांतून कापून घेऊन पुस्तकाचा नाश करतात. दोन पायांचे उंदीरच ते ! चार पायांचे उंदीरही या कार्याला कमी 'दांतभार' लावीत नाहींत. परंतु वास्तविक हे सगळे ग्रंथशत्रु नसून उलट त्यांचे हितकर मित्रच होत. कारण त्यांनीं ग्रंथांची संख्या कमी केल्यामुळें त्यांचें दुर्मिळत्व व महत्त्व इतकें वाढलेलें आहे ! डॉ. गार्नेट लिहितो—

"...This much may be said even for the enemies of books—that they have unintentionally highly encouraged the race of bibliophilists, whether bookhunters or booksellers. If books had always received the care and attention which they ought to receive, the occupation of this interesting class would be as gone as Othello's. The Gutenburg Bible would exist in two hundred and fifty copies, more or less. The Caxtons would

be numerous, perfect and in excellent condition. To find a unique, one would have to resort to such curiosities as a single impression on vellum, or a special copy prepared for presentation upon some extraordinary occasion."

एकाद्या ग्रंथाला दृढ पाया असलेला धंदेवाईक प्रकाशक लाभला म्हणजे त्या ग्रंथाची वांटणी सावकाश झाली तरी तो ग्रंथ एकदम गुप्त होत नाहीं. परंतु एकाद्या लेखकानें जर प्रकाशन स्वतःच केलें, तर त्याच्या निधनानंतर त्या ग्रंथाचा सांठा कुठें तरी गडप होऊन नष्ट होतो, किंवा कोणी तरी विकत घेऊन तो अखेर फुटपाथवर येतो. हातावरच्या पोटाच्या धंदेवाईक प्रकाशकाच्या ग्रंथांचीही हीच स्थिति असते. पुस्तकांच्या प्रकाशनांत गुंतवलेलें भांडवल फार दिवस त्यांत तसेंच अडकवून ठेवणें शक्य नसल्यामुळे तो हे पैसे उभे करण्याकरितां हे ग्रंथ कसे तरी रद्दीच्या भावानें फुंकून टाकतो! चार दिवस मग हे ग्रंथ आपणांस स्वस्त दरानें मिळाले, तरी पुढें एकदम ते अदृश्य व दुर्मिळ होतात. पराडकरांच्या मोरोपंती महाभारताच्या पर्वांचे फॉर्म रद्दीमध्यें विकण्याकरितां सोडवितांना एक व्यापारी मी स्वतः पाहिला आहे! माडगांवकरांची ज्ञानदेवी आज अशीच दुर्मिळ झाली आहे. आणखी किती तरी अशीं उदाहरणें देतां येतील. पुष्कळ वेळां दुर्मिळ किंवा मुद्रणातीत (out of print) म्हणून समजले गेलेले ग्रंथ वास्तविक तसे नसतात. आपल्याकडील कांहीं ग्रंथविक्रेते अगदीं नालायक असतात. एकाद्या पुस्तकाच्या जास्त प्रती विकत घेऊन सग्रहीं ठेवणें त्यांना जड वाटतें. बरें, एकादी मागणी आली म्हणजे त्याच्या प्रकाशकाकडून तो ग्रंथ मिळवून आणण्याची यातायात चुकविण्याकरितां ते त्याच्या प्रती मिळत नाहींत असें स्वच्छ सांगून मोकळे होतात! कांहीं दुकानदार तर—विशेषतः नोकर—दुकानांत पुस्तक असतांना तें उठून शोधावें लागतें म्हणून आळसानें गिऱ्हाइकाला तें पुस्तक नाहीं असें चक्क सांगून परत करतात!! अशा लोकांना काय म्हणावें?

## दोलामुद्रितें

एकाद्या पुस्तकाच्या चारदोनच प्रती उपलब्ध आहेत एवढेच त्या पुस्तकाच्या महत्त्वाचें खरें कारण नाहीं. तसें असतें तर एकादा मुद्रक वाटेल तेव्हां ग्रंथाची एकच प्रत छापून ती अपूर्व किंवा अनन्य (unique) म्हणून डोक्यावर घेऊन नाचता! ग्रंथ फार प्राचीनही असला पाहिजे. सर्वभक्षक काळाच्या जबड्यांतून इतकीं वर्षें सगळीं गंडांतरें चुकवून टिकून राहिला हेंच त्याच्या महत्त्वाचें खरें कारण. Bay Psalm Book नांवाचें १६४० सालीं अमेरिकेंत छापलेलें एक सामान्य चोपडें गेल्या १९४७ सालच्या जानेवारींत जें १५१००० डॉलर्सना म्हणजे सुमारें

पांच लक्ष रुपयांना विकलें गेलें, तें केवळ त्याच्या पुराणत्वामुळें होय. अमेरिकेमध्यें फार उशीरां–म्हणजे हिंदुस्थानानंतरही–मुद्रणकला गेली. पण युरोपांत तिचा उदय पंधराव्या शतकाच्या मध्यांत झाला. इ. स. १५०० पर्यंत प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांना तिकडे फार महत्त्व देतात. पंधराव्या शतकांतील पुस्तकांना Incunabula असें तिकडे नांव आहे. cunae म्हणजे लॅटिन भाषेंत पाळणा. पाळण्यांतील मुद्रण म्हणजे आद्य मुद्रितें. संस्कृत भाषेंत पाळण्याला दोला म्हणतात. त्यावरून incunabula म्हणजे 'दोलामुद्रितें' असें मराठीकरण करण्यांत आलें आहे. पण युरोपांतील incunabula ची कालमर्यादा इ. स. १५०० निश्चित ठरली आहे. आपल्याकडील दोलामुद्रितांना ही मर्यादा लावतां येणार नाहीं. कारण त्या काळीं आपल्याकडे मुद्रणकलेचा प्रवेशच झाला नव्हता. गोव्यांत छापखाना १५५६ मध्यें स्थापन झाला होता. स्टिफन्सचें मराठी ख्रिस्तपुराण तिकडे १६१६ मध्यें रोमन लिपींमध्यें छापलें गेलें. पुढें १६२२ सालीं गोमंतकी मराठी बोलींतील 'दौत्रिन क्रिस्तां' (ख्रिस्ती धर्मतत्त्व) हें पुस्तक मुद्रित झालें. हाच गोव्यांतील पहिला मराठी उपलब्ध ग्रंथ होय. आणखीही असेच कांहीं ख्रिस्ती ग्रंथ सतराव्या शतकांत गोव्यांत छापले गेले. परंतु मराठी मुद्रणाची खरी सुरुवात एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं देवनागरी लिपीचे खिळे तयार

Cap 7.

G. Pailo vpadeſſu caiſſo ſambhallucho ?

S. ſameſta Concanneãle Deua, deuadutá, anny tanchy ritu parauaddi, achara, ghaddipanna, zoiſsipanna uarzunu, yecachi ſateuanta Parameſparaca manu deũcho, tachy prati ſeua carũchy, Anny tacheri ſerua bharauanllo stheunu, tachechi laguy, zẽ caim apulea ziuaca, hou culdica zaẽ, tẽ maguchẽ, tochi ainãchea ſerua barauecacho dataru mhonnu.

G Duſſaro vpadeſſu caiſſo ſambhallũcho ?

S. Parameſparacho, ua connijequy uaſtucho ſaputu pramanna addadeddiye diũ naye.

Anny

दौत्रिन क्रिस्तां, गोवा, १६२२.

झाल्यापासून मानली पाहिजे. असा पहिला मुद्रित मराठी ग्रंथ म्हणजे डॉ. कॅरे यांचें श्रीरामपूर येथें छापलेलें मराठी ग्रामर होय. हितोपदेश वगैरे मराठी ग्रंथ तेथें मागाहून मोडींत छापण्यांत आले. आपल्याकडील दोलामुद्रितांची मर्यादा १८५० मानावी, अशा प्रकारच्या मताचा पुरस्कार, ता. १९ आक्टोबर १९४५ रोजीं दुर्मिळ ग्रंथांचें प्रदर्शन उघडतांना माझ्या भाषणांत मीं केला होता. परंतु ही मर्यादा केवळ मराठी ग्रंथांपुरतेंच पाहून ठरवितां येणार नाहीं. हिंदुस्थानांतील इतर भाषाही विचारांत घ्याव्या लागतील, हें उघड आहे. येथील गुजराती फोर्बस सभेच्या निमंत्रणावरून मीं त्या संस्थेमध्यें गुजराती मुद्रणाच्या आरंभासंबंधीं भाषण केलें, त्या वेळीं या प्रश्नाचा विचार करतांना १८५० पर्यंत गुजराती ग्रंथ फार थोडे मुद्रित झाल्याचें मला आढळलें. त्यावरून १८५० या दोलामुद्रितांच्या कालमर्यादेला, गुजराती लोक मान्यता देतील कीं काय याबद्दल शंका आहे. वास्तविक १९०० हीच हिंदुस्थानांतील दोलामुद्रितांची मर्यादा धरावी लागेल; परंतु हा काळ आम्हांला अगदींच आधुनिक वाटतो. तेव्हां दुर्मिळ ग्रंथांच्या महत्त्वाच्या दृष्टीनें १८६७ ही मर्यादा सध्यां तरी धरून चालावी असें आम्हीं ठरविलें आणि तीच कालमर्यादा पुढील ग्रंथनामावलीच्या बाबतींत स्वीकारण्यांत आलेली आहे.

APPENDIX. ६१

अहो इंगरेजी मोटी विद्या आहे शिक त्यास फार उपयोगी पडेल।

बहुत चांगलें मीं याचा उद्योग करतों आहे।

दाजी गेले काहेत त्यांजबरोबर येऊन येतील तुम्ही पुढे चला आम्हीही मागून येतों। जर ते आगोधर आम्हाहून पावेत तर बहुत उत्तम आहे नांहीं तर त्यांचे आगमन इथले वाट पडेल त्याचा पाठीशी पडतील।

माहाराज काहीं चिन्ता नेघे पाहल्यावर आपले आज्ञाप्रमाणें उद्योग केला जाईल।

अहो तात्या मीं तर माहातारा जालों दांत पडूं लागलेत वृद्धावस्थेंत इच्छा शिथल जाल्यांत जीवनाचे सुख किमपि नाहीं। त बाल्यावस्थेचे सुखास विसरून शरीर अनित्य जाणून काश्यादिक तीर्थाचे सेवन,

मराठी भाषेचें ग्रामर, श्रीरामपूर, १८०५.

## १८६७ हीच कालमर्यादा कां

आतां १८६७ हीच मर्यादा कां पसंत केली, यासंबंधीं दोन शब्द येथें सांगणें अवश्य आहे. १८६७ सालीं हिंदुस्थानसरकारचा देशी प्रकाशनाच्या नोंदणीचा २५ वा कायदा पास झाला आणि देशी ग्रंथसंरक्षणाच्या दृष्टीनें एक नवें युग सुरू झालें असें म्हणावयास हरकत नाहीं. याच्याही पूर्वी १८४७ सालचा प्रकाशनाचा विसावा कायदा अस्तित्वांत होता, परंतु त्यांत ग्रंथकाराच्या मालकी-हक्काच्या रक्षणापलीकडे ग्रंथसंरक्षणाची दृष्टि बिलकूल नव्हती. १८६७ च्या कायद्याप्रमाणें प्रत्येक प्रकाशनाच्या तीन प्रती मुद्रित झाल्याबरोबर एका महिन्याच्या आंत सरकारकडे पाठवाव्या असें ठरलें. या प्रतींचा विनियोग कसा होई तें या २५ व्या ॲक्टाचें पुढील अकरावें कलम पाहिल्यास कळून येईल:—

आरंभ संग्रह ।—

पुस्तकाचे आरंभी विघ्ननाशासाठीं प्रथमतः प्रार्थ
आनुष मंगळाचरण करीत आहे ।—

गंगेचे फेणाचे नेत्रप्रमाणे चंद्रकळा ज्याचे मस्तकीं
आहे त्या महादेवाचे अनुग्रहाने साधु लोकांस साध्य
असे सौख्य होवो ।—

आयकीस हे हितोपदेश व संस्कृत गोष्टीत् पशूंस
आणी सर्वत्र गोष्टीत् पैंलोकस आणी नीती सोध्या हेतो ।
बुद्धीमान मनुष्य ज्ञान आणी धनाचे आसा होईल्
तीच्या आणी धन ज्यांना करील आणखीन यमाने शेंडी
धरली आहे या प्रमाणे होईन धर्माचरण करील ।
आणी ज्ञान सर्वामध्ये तीच्या अनुभव रूप हे
पंडीतांनीं म्हटलें आहे त्या नीतीमुळे तीच्याच ज्ञानाचे
समयीं वैनायीकरूप आचरणीयस आणी आणीयस
आणी अक्षयस आहे । आणखीन तीच्या मन नीच
मनुष्यास् देय रान त्याच् मनुष्यास् हुष्याण आणास्

हितोपदेश (मोडी), श्रीरामपूर, १८१५.

"One of such copies shall be transmitted to the Secretary of State for India, another copy shall be disposed of as the Governor General of India in Council shall from time to time, by general or

special order, direct, and the remaining copy shall after a memorandum containing the particulars hereinafter mentioned respecting the book shall have been registerd as hereinafter provided, be deposited in such public library, or be otherwise disposed of, as the local Government shall from time to time determine."

या कायद्याचा मागचा इतिहास पाहतां त्याच्या मुळाशीं देशी ग्रंथांच्या संरक्षणाची इच्छा होती, असें दिसून येतें. मात्र तिचा उगम हिंदुस्थानांत नसून इंग्लंडांत होता, ही विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट होय. १८६३ सालीं The Royal Asiatic Society of Great Britain and Ireland या संस्थेच्या अधिकाऱ्यांनीं The Secretary of State for India यांना पत्र लिहून हिंदुस्थानांत संस्कृत किंवा इतर देशी भाषांमध्यें जे ग्रंथ प्रसिद्ध होतात त्यांची माहिती युरोपियन अभ्यासकांना नसते. तरी याकरितां आतांपर्यंत हिंदुस्थानांत जें प्रकाशन झालें असेल, त्यांची एक शक्य तितकी पूर्ण नामावलि तयार करावी व यापुढें प्रसिद्ध होणाऱ्या प्रकाशनाच्या त्रैमासिक याद्या त्यांना सादर कराव्या, अशा प्रकारची विनंती केली. या विनंतीपत्रांत ते लिहितात, "This assistance would be, in our opinion, perfectly justified, also on legal grounds. Five of our great libraries are entitled to a copy of every work published in the British Empire. *The law conferring on them this privilege was intended to preclude the ultimate loss of any such book.* Hitherto, however, these libraries have been practically deprived of the fruits of this privilege so far as India is concerned, chiefly, as we suppose, because the Hindus are unaware of the obligation imposed on them by law to furnish copies of their publications to the libraries in question."

## ग्रँटच्या कॅटलॉगांतील घोटाळे

यावरून १८६७ च्या २५ व्या ॲक्टाअन्वयें सरकारकडे तीन प्रती पाठवायाच्या त्यांचा अंतिम हेतु काय होता तें कळून येईल. याहीपूर्वी मधूनमधून प्रांतिक सरकारामार्फत त्या त्या भागांत प्रसिद्ध होणारे देशी ग्रंथ मिळवून ते ईस्ट इंडिया हौसमध्यें संगृहीत केले जात. The Hon. East India Company च्या लायब्ररीचे १८४५ व १८५१ सालीं प्रसिद्ध झालेले दोन कॅटलॉग पाहिल्यास त्या वेळीं कोणतीं पुस्तकें जमा झालीं होतीं तें कळून येतें. स्टेट सेक्रेटरीच्या अधिकारावर त्या वेळीं सर चार्लस वुड होते. त्यांनीं हिंदुस्थानसरकारला कळविलें व तिकडून निरनिराळ्या प्रांतिक सरकारांना हुकूम सुटले; अशा प्रकारें हें चक्र सुरू झालें आणि त्याचें फल म्हणजे १८६७ सालचा २५ वा ॲक्ट आणि मुंबई इलाख्यापुरतें बोलावयाचें झाल्यास ग्रँट व पील यांचे देशी प्रकाशनांचे कॅटलॉग होत. या कायद्यानंतर प्रसिद्ध झालेल्या इंग्रजी अमलाखालील मुलखांतील प्रकाशनाची नोंद आपणांस ओरिएंटल ट्रान्स्लेटर मार्फत दरसाल प्रसिद्ध होणाऱ्या त्रैमासिक याद्यांमध्यें मिळूं शकते. परंतु त्याच्या पूर्वीच्या पुस्तकांची नोंद मात्र व्यवस्थित नाहीं. ती बिनचूक व्हावी, याबद्दल मुंबई सरकारनें शक्य तितकी दक्षता घेतली, परंतु लोकांकडून योग्य तें सहकार्य लाभलें नाहीं. प्रथम कलेक्टर व मॅजिस्ट्रेटमार्फत त्या त्या जिल्ह्यामधील छापखान्यांकडून त्यांनीं मुद्रित केलेल्या पुस्तकांच्या याद्या मागविल्या; त्या अत्यंत सदोष व अपूर्ण वाटल्यावरून डेप्युटी एज्युकेशनल इन्स्पेक्टरमार्फत ही माहिती पुनः जमा केली. परंतु स्वतः छापखान्यांतच त्यांनीं मुद्रित केलेलीं पुस्तकें किंवा त्यांची नोंद नव्हती व ही माहिती कशी गोळा करावी याची कल्पना इन्स्पेक्टर लोकांना नव्हती, त्यामुळें ही माहिती अपूर्ण व सदोष राहिली. असें असतांही यावरून १८६४ अखेरपर्यंत प्रसिद्ध झालेया पुस्तकांचा कॅटलॉग तयार करून १८६६ सालीं सरकारनें छापून काढला व त्याच्या प्रती इलाख्यांतील निरनिराळ्या युरोपियन व हिंदी विद्वानांकडे पाठवून त्यांत असलेल्या उणिवा व चुका सरकारच्या नजरेस आणाव्या असें सुचविलें. या बाबतींत ज्यांच्याकडून सहकार्य लाभलें, त्यांत मेजर कँडी, विनायक वासुदेव, कृष्णशास्त्री चिपळूणकर, के. ल. छत्रे, भास्कर दा. पाळंदे, शं. पां. पंडित यांचीं नांवें आहेत. रे. विल्सन, डॉ. भाऊ दाजी, दादोबा पांडुरंग, मोरोबा कानोबा यांच्याकडून कांहींच माहिती आली नाहीं! जुन्या यादींत ही माहिती अन्तर्भूत

करून नवा कॅटलॅाग बनविण्याचें काम Mr. John Nugent, I. C. S. यांच्याकडे सोपविण्यांत आले होतें. १८६४ च्या अखेरपर्यंतच्या पुस्तकांचा हा कॅट-लॅाग १८६७ सालीं प्रसिद्ध झाला. मराठी पुस्तकांवर कै. म. गो. रानडे यांनीं लिहि-लेला छोटा प्रबंधही या कॅटलॅागला जोडला आहे. परंतु इतकें करूनही ही यादी अत्यंत अपूर्ण व चुकीच्या माहितीनें भरलेली आढळते. याचें कारण प्रत्यक्ष ग्रंथ पाहून ती तयार झालेली नाहीं. ज्यांच्यावर हा कॅटलॅाग आधारलेला आहे, त्यांपैकीं कांहीं याद्या केवळ बेजबाबदारपणें प्रत्यक्ष पुस्तक न पाहतां स्मरणावर भिस्त ठेवून लिहिल्या असल्या पाहिजेत. बाळमित्र ( भाग १ ला ), मोल्स्वर्थचा सुप्रसिद्ध मराठी-इंग्रजी कोश, इसापनीति, अशासारख्या प्रसिद्ध पुस्तकांच्या पहिल्या एडिशनचा यांत नामनिर्देश नाहीं. बाळमित्राच्या दुसऱ्या भागाच्या तर कोणत्याही आवृत्तीचा मागमूसही नाहीं. " दादोक्त मराठी व्याकरण "(No.368) या ग्रंथाचा छापखाना, प्रकाशनस्थल, काल, आकार किंवा किंमत सर्व not known असा शेरा आहे, पण याच ग्रंथाचा संपूर्ण तपशील 'मराठी भाषेचें व्याकरण '(No. 552) या नांवाखालीं सांपडतो. नवनीत या सुप्रसिद्ध ग्रंथाची नोंद ' कवितेचे वेचे ' (No. 513) व नवनीत अशा दोन नांवाखालीं (No. 587-592) केली आहे. नव-नीताच्या १८६४ च्या पांचव्या आवृत्तीची नोंद दोन ठिकाणीं आहे. (No.513, 592). १८६२ च्या नवनीताच्या चौथ्या आवृत्तीचीही नोंद दोन ठिकाणीं करून एकीकडे (No. 588) सर्व तपशील दिला आहे तर दुसरीकडे मुद्रणालय व आकार not known असा शेरा आहे. (No. 591) पृष्ठसंख्येचे तर फार घोटाळे असले पाहिजेत. याच चौथ्या आवृत्तीची पृष्ठसंख्या ३२१ अशी दिली आहे (No. 588) पण वास्तविक ती ६+३२२+३४ इतकी असली पाहिजे. म्हणजे आरंभींची प्रस्तावना व शेवटचा शब्दकोश यांची पृष्ठसंख्या विचारांत अजिबात घेतलेली नाहीं. नवनीत भाग २, **कवितासारसंग्रह** या नांवाखालीं परशुरामपंत गोडबोले यांनींच १८६३ सालीं प्रथम तयार केला होता. त्याची नोंद अन्यत्र "कवितेचे वेंचे भाग २ " या नांवा-खालीं (No. 514) सांपडते; परंतु नवनीत " Part I and II " अशी नोंद एक वर्ष आधींच म्हणजे १८६२ सालीं दाखविली आहे ! (No. 588) रा. सा. भास्कर दामोदर पाळंदे यांनीं या नवनीताच्या चौथ्या आवृत्तीच्या कांहीं प्रतींना " पद्यरचना " व " कवींचें वर्णन " असे दोन निबंध आरंभीं जोडलेले आढळतात. त्यांचाच " Part II " असा चुकीनें उल्लेख केला असल्यास

नकळे. तसें असल्यास वर सांगितल्याप्रमाणें या ग्रंथाची पृष्ठसंख्या ३२१ न राहतां आणखी ६+६८+३२२+३४ अशी वाढेल.

" इंग्लंडचें वर्णन " अशी एका १८३५ सालांतील नोंद करून (No. 482) त्याचा कर्ता " कवि केशवजी " असा दिला आहे. ' कवि केशवजी ' असा मराठी लेखक आतांपर्यंत कोणी झालाच नाहीं. हरि केशवजी ऐवजीं चुकीनें कवि केशवजी पडलें असावें. पण हरि केशवजीच्या पुस्तकाचें नांव **इंग्लांडाचा वृत्तांत** असा आहे, व तो १८३७ सालीं प्रसिद्ध झाला. १८३५ सालीं इंग्लंड देशाचें वर्णन नांवाचें एक पुस्तक प्रसिद्ध झालें; पण त्याचा कर्ता ' कवि केशवजी ' नसून **नाना नारायण** आहे. मिस् बर्ड हिच्या इंग्रजी पुस्तकाचें हें भाषांतर. याच पुस्तकाची वरील नोंद दिसते. हरि केशवजीच्या इंग्लांडाच्या वृत्तांताची नोंद या कॅटलॉगांतच अन्यत्र सांपडते. ( No. 488 ) पण त्याचा मुद्रणकाल १८३७ असतां १८५७ दिला आहे. रामजी गणोजी चौगुले यांच्या एकाच पुस्तकाची नोंद स्त्रीचरित्र (No. 777) व Ramji Doctor's Stories (No.680) अशा दोन नांवांनीं झाली आहे. असे अनेक घोटाळे या कॅटलॉगांत आहेत. ता. १ जानेवारी १८६५ ते ३० जून १८६७ म्हणजे १८६७ सालचा २५ वा ॲक्ट अमलांत येण्यापूर्वीच्या पुस्तकाचा एक पुरवणी कॅटलॉग J. B. Peile यांच्या नांवानें प्रसिद्ध झाला. तो तयार करण्याची कामगिरी कृष्णशास्त्री चिपळूणकर यांच्याकडे होती. जुन्या कॅटलॉगांत नसलेल्या कांहीं पुस्तकांची नोंद या कॅटलॉगांत आहे, परंतु जुन्या पुस्तकांतील चुका यांत सुधारण्याचा प्रयत्न झालेला नाहीं.

यावरून १८६७ पर्यंतचा प्रकाशनाचा कालविभाग व या कालावधींत मुद्रित झालेलीं पुस्तकें विशेष महत्त्वाचीं कां मानलीं पाहिजेत तें कळून येईल.

## नेटिव लायब्ऱ्यांमध्यें ' नेटिव ' ग्रंथांची आबाळ !

ग्रेटब्रिटनमधील रॉयल एशियाटिक सोसायटीच्या चालकांना हिंदुस्थानांतील देशी प्रकाशनें आपण संगृहीत करावीं अशी इच्छा झाली; परंतु खुद्द आपल्याकडील तिच्या शाखेचें या प्रश्नाकडे लक्ष गेल्याचें दिसत नाहीं. सर जेम्स मॅकिंटोश यांनीं १८०४ सालीं एका डॉक्टरकडून त्याचा वैयक्तिक ग्रंथसंग्रह विकत घेऊन या शाखेच्या ग्रंथसंग्रहाचा पाया घातला. त्या वेळीं लिटररी सोसायटी असें तिचें नांव होतें. १८२९ पासून ती आपणांस रॉयल एशियाटिक सोसायटीची शाखा म्हणवूं लागली; परंतु ती बड्या लोकांकरितां असल्यामुळें सर्वसाधारण युरोपियन व देशी

लोकांच्या उपयोगाकरितां १८२९ सालीं बँबे क्युरियरचे संपादक स्टॉकेलर ( J.H. Stocqueler) यांच्या प्रयत्नानें **जनरल लायब्ररी** स्थापन झाली. पुढें १८३८ सालीं कॅप्टन फ्रेंच (Cap Pat. Theo. French) यांनीं अहमदनगर येथें पहिली नेटिव जनरल लायब्ररी स्थापन केली. यानंतर विशेषतः त्यांच्याच प्रयत्नानें इलाखाभर निरनिराळ्या जिल्ह्यांमध्यें अशा प्रकारच्या लायब्ऱ्या हळूहळू निघाल्या; परंतु त्यांत इंग्रजी ग्रंथांनाच महत्त्व होतें. १८४८ सालीं सुरू झालेल्या पुणें सिटी जनरल लायब्ररीमध्यें कदाचित् विशेष आस्थेनें मराठी ग्रंथ संगृहीत झाले असावेत; परंतु ता. १३ मे १८७९ रोजीं पुण्यांतील बुधवारवाड्याला आग लागली आणि उपरिनिर्दिष्ट पहिला ग्रंथशत्रु जो अग्निनारायण त्याला या लायब्ररीचा सगळा ग्रंथसंग्रह बळी पडून भस्मसात् झाला ! तरीपण जुन्याकाळीं या संग्रहांतील इंग्रजी व मराठी पुस्तकांचें प्रमाण काय होतें, त्याची कल्पना करतां येण्यासारखी आहे. १८५० सालीं यांत इंग्रजी पुस्तकें १६२२ व संस्कृत व मराठी मिळून १८५ पुस्तकें होतीं, अशी बोर्ड ऑफ एज्युकेशनच्या रिपोर्टांत ( १८५०-५१ ) माहिती सांपडते. १८५२ सालीं या लायब्ररींत इंग्रजी पुस्तकें १८०० व "प्राकृत" पुस्तकें २५७ होतीं असाही तपशील उपलब्ध आहे. ( पुण्याचें वर्णन ). यावरून इतर लायब्ऱ्यांतील मराठी ग्रंथांच्या प्रमाणाची कल्पना होईल.

## केवळ मराठी ग्रंथांकरितां संग्रहालय

या नेटिव जनरल लायब्ऱ्यांच्या द्वारा मराठी ग्रंथांचा संग्रह व संरक्षण होणार नाहीं, हें प्रथम महाराष्ट्रसारस्वतकार कै. विनायक लक्ष्मण भावे यांनीं जाणलें. त्यांच्याच प्रयत्नानें ता. १ जून १८९३ रोजीं केवळ मराठी ग्रंथांचा संग्रह करण्याच्या बुद्धीनें ठाणें येथील मराठी ग्रंथसंग्रहालय निघालें. त्याच्या १८९४ सालीं निघालेल्या पहिल्या रिपोर्टांत पुढील मजकूर आढळतो—

"आपली देशी भाषा सुधारण्यासाठीं आजपर्यंत पुष्कळांनीं पुष्कळ उपाय केले, कोणी ग्रंथ लिहिले, कोणी जुने ग्रंथ मिळवून तपासून ते प्रसिद्ध केले, परंतु **हे सगळे ग्रंथ एके ठिकाणीं जमविण्याचा प्रयत्न कोणी नीटसा केलेला ऐकिवांत नाहीं.** आपल्या देशांत पुस्तकालयें बरींच आहेत, परंतु मराठी भाषेच्या संबंधानें पाहतां त्यांतील व्यवस्था समाधानकारक नाहीं. बहुतकरून सर्व चांगल्या ग्रंथसंग्रहालयांत मराठी व इंग्रजी या दोन्ही भाषांतील पुस्तकें ठेवण्याचा संप्रदाय असतो. आतां इंग्रजी भाषेंत मराठीपेक्षां ग्रंथसंग्रह विशेष

चांगला व जास्त, यामुळें बहुतेक पैसा इंग्रजी पुस्तकें घेण्याकडे खर्ची पडतो व मराठी ग्रंथांचा संग्रह व्हावा तसा होत नाहीं; ही आपल्या देशांत भाषेसंबंधीं एक मोठी उणीव आहे. ही उणीव लक्ष्यांत घेऊन हें मराठी ग्रंथसंग्रहालय स्थापन झालें." ठाण्याच्या मराठी ग्रंथसंग्रहालयाचा आदर्श पुढें ठेवून १८९८ सालीं मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाची उभारणी झाली.

## चांगली प्रत कोणती

जून १८६७ अखेर प्रसिद्ध झालेल्या ग्रँट व पील यांच्या कॅटलॉगांतील मराठी नोंदींची संख्या ९४५ आहे. प्रत्येक ग्रंथाच्या निरनिराळ्या आवृत्त्या, छोटीं पुस्तकें व मुंबई सरकारच्या अधिकारक्षेत्राबाहेर मुद्रित झालेलीं पुस्तकें जमेस धरलीं तर १८६७ अखेर मुद्रित झालेल्या एकंदर मराठी ग्रंथांची संख्या दीड हजारांवर असावी, असा तर्क करतां येतो. आज कोणत्याही ग्रंथसंग्रहालयापेक्षां मुं. म. ग्रं. संग्रहालयांत जास्त मराठी ग्रंथ आहेत, असा अभिमान बाळगिला जातो; परंतु १८६७ पर्यंतच्या दोलामुद्रितांची संख्या इतकी कमी असावी, हें पाहून खरोखरच वाईट वाटतें. हीं जीं कांहीं या कालांतील पुस्तकें गोळा झालीं तीं अजाणतां झालेलीं आहेत. युरोप किंवा अमेरिका येथें जसा जुने ग्रंथ मिळविण्याचा मुद्दाम जोराचा प्रयत्न केला जातो, तसा प्रयत्न कुणीही केलेला नाहीं. कै. पुणतांबेकर प्रभृति संस्थापकांनीं मागणी केली म्हणून किंवा स्वयंस्फूर्तीनें लोकांनीं हात उचलून जवळचीं पुस्तकें दिलीं. याचा परिणाम असा झाला कीं कांहीं पुस्तकांची स्थिति (condition) वाईट आहे. एकाला कांहीं पृष्ठेंच कमी आहेत तर दुसऱ्याचा कागद खराब झाला आहे; तिसऱ्यावर कसरीनें करामत केली आहे, तर चौथ्याच्या मजकुरावर बाइंडरनें घाव घातलेला आहे! अशा प्रती काढून त्या जागीं दुसऱ्या चांगल्या (fine) प्रती ठेवल्या पाहिजेत. युरोप किंवा अमेरिका येथें अत्यंत चोखंदळ असे ग्रंथसंग्राहक किंवा अशा पुस्तकांचे विक्रेते यांच्या तीक्ष्ण पाहणीनंतर पुस्तक संगृहीत होतें, तसा आपल्याकडे प्रकार नाहीं. म्हणून मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या ज्या कोणा अभिमान्याला एकादें दुर्मिळ पुस्तक ग्रंथसंग्रहालयाला देणगीदाखल किंवा विकत देऊन संग्रहाला पूर्णत्व आणण्याच्या कार्याला हातभार लावावयाचा असेल, त्यानें आपल्याजवळ असलेल्या पुस्तकाचें नांव पुढील नामावलींत दिसलें म्हणून संग्रहालयाला त्याची जरूरी नाहीं असें समजूं नये, आणि तें देण्याच्या बाबतींत माघार घेऊं नये, अशी अत्यंत आग्रहाची विनंति आहे. चांगली

प्रत जोंपर्यंत मिळाली नाहीं, तोंपर्यंत असेल ती संभाळावी लागते. चांगली (fine) प्रत नक्की कशाला म्हणावें हा मतभेदाचा प्रश्न आहे. मि. जॉन कार्टर या एका संग्राहकानें तिचें लक्षण दिलें आहे तें असें—

"In its most absolute sense, I suppose, the term 'fine,' applied to any book of any period, could be said to mean no more (if no less) than that all its leaves were present, clean, whole and amply margined; that it was sound and undisturbed in its binding; and that that binding, whatever its material, was fresh and unblemished and, if of leather, of a sufficient elegance to raise it above the modest category of neat."

## नवें संयुक्त क्रमपुस्तक हवें

दुर्मिळ ग्रंथांचें प्रस्तुत क्रमपुस्तक (catalogue) मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या सुवर्णमहोत्सवाच्या प्रसंगीं सुमुहूर्तावर प्रसिद्ध व्हावें या भावनेमुळें घाईत तयार झालें आहे. त्यामुळें त्याची आंखणी व रचना जितकी निर्दोष व पूर्ण व्हावयाला पाहिजे तितकी झाली नसणें संभवनीय आहे. मला स्वतःला त्याचें विशेष निरीक्षण करण्यास सवड मिळालेली नाहीं. तरी पण हा प्रयत्न कच्चा खर्डा (draft edition) असें मानून मोठ्या प्रमाणावर जास्त पद्धतशीर असें क्रमपुस्तक तयार करण्याचें कार्य मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालयानें किंवा दुसऱ्या एकाद्या संस्थेनें हातीं घ्यावें, अशी माझी सूचना आहे. दोलामुद्रिताच्या क्रमपुस्तकाची मांडणी कांहीं विशिष्ट पद्धतीनें संशोधनपूर्वक तपशीलवार करावयाची असते. या बाबतींत रॉबर्ट जॉर्ज प्रॉक्टर यानें ब्रिटिश म्युझियममधील दोलामुद्रितांची दर्शिका (Index) १८९७ सालीं प्रसिद्ध केली आहे, ती अवश्य विचारांत घ्यावी लागेल. अखंड परिश्रमाचा व अचूक कष्टाळूपणाचा तो एक आदर्श समजला जातो. निरनिराळ्या जुन्या टाइपांचे सूक्ष्म भेद ओळखण्याची त्याला विलक्षण दृष्टि होती असें म्हणतात. या ध्यासामुळें तो अखेर अंध बनला. त्यानें योजिलेल्या क्रमपद्धतीला "Proctor order" असें नांव आहे. देश, शहर, छापखाना आणि नंतर ( त्याचा उपविभाग म्हणून ) कालानुक्रम अशी ही पद्धति आहे. पुढें प्रस्तुत क्रमपुस्तकांत जरी पुस्तकें कालानुक्रमानें दिलेलीं आहेत, तरी परिशिष्टांत स्थलदर्शिका पाहिल्यास प्रॉक्टरक्रमाचाही फायदा अभ्यासकांना मिळूं शकेल.

मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयानें जर नवें दोलामुद्रितांचें क्रमपुस्तक तयार करावयाचें ठरविलें, तर त्यांत आपल्या संग्रहालयांतील ग्रंथांचें पद्धतशीर तपशीलवार वर्णन तर असावेंच, परंतु येथें नसलेल्या पण इतर संस्थांच्या किंवा वैयक्तिक संग्रहीं असलेल्या पुस्तकांची प्रत्यक्ष पाहून माहिती द्यावी. इतकेंच नव्हे तर हें पुस्तक कोठें आहे याचा स्थलदर्शक असा एखादा आंकडा, अक्षर, किंवा खूण त्या पुस्तकाच्या नांवापुढें द्यावी. त्याचप्रमाणें एखादें पुस्तक प्रत्यक्ष पाहावयास मिळालें नसल्यास पण त्याचें अस्तित्व ज्या एखाद्या संग्रहालयाच्या यादीमध्यें किंवा मासिकांतील परीक्षणामध्यें किंवा जुन्या वृत्तपत्राच्या जाहिरातीमध्यें सांपडल्यास त्यांत मिळेल ती माहिती द्यावी व त्यांचा आधार स्पष्ट नमूद करावा. म्हणजे अशा संयुक्त क्रमपुस्तकाचा (Union Catalogue) अभ्यासकांना फार उपयोग होईल. अशा ग्रंथानें प्रस्तुत क्रमपुस्तक अग्रदूत (precursor) ठरेल अशी मला आशा आहे.

## अंतिम हेतु साफ फसला

जून १८६७ अखेरपर्यंतच्या पुस्तकांची संपूर्ण विश्वसनीय नोंद अशी नाहीं. निरनिराळे संग्रह व संदर्भ पाहून अशा प्रकाशनांची नवी नामावलि तयार करावी लागेल. यामुळें या कालांतील पुस्तकांना विशेष महत्त्व प्राप्त झालें आहे, हें येथ-पर्यंत केलेल्या विवेचनावरून कळून येईल. १८६७ सालच्या २५ व्या ॲक्टांतील नियमाप्रमाणें ता. १ जुलै १८६७ पासून देशी प्रकाशनांच्या त्रैमासिक नामावल्या निघूं लागल्या. त्यांवरून, कांहीं दृष्टिदोष किंवा हस्तदोष अशा कारकुनी चुका वगळल्या तर इंग्रजी अमलाखालीं कोणतीं पुस्तकें मुद्रित झालीं तें आपणास निश्चित कळूं शकतें; परंतु पुस्तकांचीं नांवें कळलीं, तरी तीं पुस्तकें पाहावयास मिळतीलच, याची मात्र खात्री देतां येत नाहीं. वर रॉयल एशियाटिक सोसायटीच्या पत्रांतील जो इंग्रजी उतारा उद्धृत केला आहे, त्यावरून इंग्लंडमध्यें तेथील मुद्रकांना सरकारकडे ज्या पांच प्रती पाठवाव्या लागतात, त्याचा अंतिम हेतु त्यांची एखादी तरी प्रत कोठें तरी शिल्लक राहावी (preclude the ultimate loss of any such book) हाच होता, हें उघड दिसून येईल. १८६७ च्या कायद्या-प्रमाणें आपल्याकडील मुद्रकांना ज्या तीन प्रती सरकारकडे पाठवाव्या लागतात त्याचाही हेतु हाच असला पाहिजे. हा ॲक्ट पास होण्याच्या पूर्वी ता. १५ मार्च १८६६ रोजीं डायरेक्टर सर अलेक्झांडर ग्रँट यानें आपल्या सरकारला पाठविलेल्या पत्रांत

"I would suggest that two copies of every book published ...should be in this manner taken by Government, of which one should be deposited in the Library of the University of Bombay, and one transmitted to the India Office"

अशी सूचनाही केली होती. पुढें दोनऐवजीं तीन प्रती सरकारकडे पाठविण्याचा कायदा झाला. यांपैकीं एका प्रतीची करुणाजनक कहाणी मीं दुर्मिळ ग्रंथाचें प्रदर्शन उघडतांना केलेल्या भाषणांत ( पंचारती पृ० ३२ ) निवेदन केली होती तशीच येथें देतोः " ता. २० जुलै १८७१ च्या गॅझेटमध्यें ( पृ० ७८१ ) जाहीर केल्याप्रमाणें ही प्रत ( स्थानिक सरकारकडे जावयाची ) डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन यांनीं मुंबई इलाख्यांतील वाङ्मयाच्या वार्षिक आढाव्या-करितां उपयोग करून नंतर मुंबई युनिव्हर्सिटीच्या रजिस्ट्रारकडे पाठवावी अशी व्यवस्था करण्यांत आली व त्याप्रमाणें ही प्रत युनिव्हर्सिटीकडे जाऊं लागली. पुढें १८९० सालीं हीं जीं पुस्तकें युनिव्हर्सिटीकडे जातात, त्यांची काय व्यवस्था आहे, अशी सरकारनें युनिव्हर्सिटीकडे विचारणा केली. तिला उत्तरादाखल युनिव्ह-र्सिटीचे त्यावेळचे रजिस्ट्रार Mr. D. Macdonald यांच्याकडून जें पत्र गेलें त्यांत म्हटलें आहे कीं, नेटिव पब्लिकेशनच्या रजिस्ट्रारकडून जीं २२, ५२४ पुस्तकें आलीं त्यांपैकीं ५,१६४ वाळवीनें खाल्लीं किंवा गहाळ झालीं आहेत, तरी राहिलेलीं १७३६० पुस्तकें सरकार म्हणेल त्याच्या हवालीं करण्यास सिंडिकेट तयार आहे ! ! ! युनिव्हर्सिटीकडून अशा प्रकारचें विलक्षण उत्तर आल्या-वर सरकारनें येथील रॉयल एशियाटिक सोसायटीकडे " तुम्ही तरी हीं पुस्तकें ठेवाल का हो ? " अशी पृच्छा केली. तिला ता. ८ अक्टोबर १८९० च्या पत्रानें सोसायटीचे सन्मान्य कार्यवाह श्रीयुत जव्हेरीलाल याज्ञिक यांनीं उत्तर दिलें आहे त्यांत म्हटलें आहे कीं, दरवर्षी भेटीदाखल येणाऱ्या किंवा विकत घेतलेल्या पुस्तकां-मुळें आमचा संग्रह सारखा वाढत असून त्यांनाच आपली जागा अपुरी वाटत आहे; अशा परिस्थितींत या नव्या संग्रहाचा ताबा घेणें कमिटीला शक्य होत नाहीं व त्याची व्यवस्था ठेवण्यास सोसायटीकडे माणसेंही नाहींत. शेवटीं १८९० च्या नोव्हेंबर महिन्यांत हीं पुस्तकें सरकारच्या रेकॉर्ड ऑफिसांत सांठवावीं असा निर्णय घेण्यांत आला. " हा एजियनचा तबेला एकदोन वर्षांमागेंच साफ करून त्यांतील मराठी, कानडी व गुजराती पुस्तकें अनुक्रमें पुणें, धारवाड व अहमदाबाद येथील

प्रादेशिक ग्रंथालयांत व बाकीचीं इंग्रजी, संस्कृत, उर्दू वगैरे मध्यवर्ति ग्रंथालयांत पाठविण्यांत आलीं आहेत. पुण्याच्या प्रादेशिक ग्रंथालयांतील हा ग्रंथसंग्रह मीं पाहिला आहे. त्यावरून त्यांतील तीनचतुर्थांश देखील पुस्तकें शिल्लक राहिलीं असतील असें वाटत नाहीं. आणखी राहिलीं तीं देखील पुष्कळशीं सटरफटर असून त्यांपैकीं कांहींची स्थिति बरीच काळजी करण्यासारखी झाली आहे ! आम्हांलाच जेथें आपल्या ग्रंथसंग्रहासंबंधीं आस्था नाहीं तेथें परक्यांना ती कशी असणार ? १८६७ च्या २५ व्या ॲक्टाप्रमाणें राहिलेल्या प्रतींपैकीं दुसरी प्रत इंडिया ऑफिस-मध्यें जात होतीच; तिसरी ब्रिटिश म्युझियमकडे पाठविली जाते, असें १८९० च्या १० व्या ॲक्टावरून दिसतें. परंतु पुस्तकाची प्रत्येक प्रत इंडिया ऑफिस किंवा ब्रिटिश म्युझियम संगृहीत करी असें वाटत नाहीं. १८९० चा दहाव्या ॲक्ट म्हणजे १८६७ च्या २५ व्या ॲक्टामधील कांहीं कलमांची दुरुस्ती होय. पूर्वीच्या ॲक्टाअन्वयें मुद्रकाला एका महिन्याच्या आंत सरकारकडे पुस्तकाच्या तीन प्रती पाठवाव्या लागत. नव्या ॲक्टांत पुस्तक पाठविण्यासंबंधीं काय कायदा झाला तें कळण्यास त्यांतील नवव्या कलमाचीं खालील पोटकलमें पहा:—

(a) in any case, within one calendar month after the day on which any such book shall first be delivered out of the press, one such copy; and,

(b) if within one calendar year from such day the local Government shall require the printer to deliver other such copies not exceeding two in number then within one calender month after the day on which any such requisition shall be made by the Local Government on the printer, another such copy, or two other such copies as the Local Government may direct.

याचा अर्थ असा कीं (a) प्रमाणें स्थानिक सरकारची पहिली प्रत आधीं सादर करावयाची व तिच्या आधारावर प्रकाशनांची त्रैमासिक यादी तयार होऊन ती इंग्लंडांत गेल्यावर ब्रिटिश म्युझियमच्या किंवा इंडिया ऑफिसच्या अधिकाऱ्यांना यांपैकीं एकादें पुस्तक आपल्या संग्रहीं असावें असें जर वाटलें व त्यांनीं तशी

एका वर्षाच्या आंत (b) प्रमाणें मागणी केली, तरच आणखी दोन प्रती मुद्रकांनीं सादर करावयाच्या. यासंबंधीं चौकशी केली असतां असें कळलें कीं, साधारणतः प्रथम एकच प्रत पाठविली, तरी बाकीच्या दोन प्रतींची पुनः मागणी होईल म्हणून दोनदां प्रती पाठविण्याचा त्रास चुकविण्याकरितां मुद्रक तीनही प्रती एकदमच रवाना करून मोकळे होत. अलीकडे मुद्रक कागदाच्या महागाईमुळें तीनही प्रती एकदम रवाना करीत नाहींत. सरकारकडून ब्रिटिश म्युझिगम किंवा इंडिया ऑफिस यांना पाठविण्याकरितां किती प्रतींची मागणी होते, हे जाणून घेण्याकरितां मीं मुंबईतील पांच मुद्रकांना पत्रें लिहून १९४७ व १९४८ या दोन वर्षांत अशा किती पुस्तकांची पुनः मागणी झाली याची चौकशी केली.यापैकीं दोघांनीं अशी नोंद आपण ठेवलीच नसल्याचें कळविलें. अशा प्रकारें मराठी पुस्तकांची पुनः मागणी झालीच नाहीं, असें निर्णयसागर प्रेस कळवितो. श्री-लक्ष्मीनारायण प्रेसनें विशेष तपशीलवार माहिती पाठविली. १९४७ सालीं त्यांच्याकडून एकंदर ३४ पुस्तकें प्रथम सरकारकडे गेलीं व त्यापैकीं 'गांधीजींच्या सान्निध्यांत' या पुस्तकाच्या दोन व 'उघड्या खिडक्या' या पुस्तकाची एक अशा प्रतींची पुनः मागणी झाली. १९४८ सालीं त्यांच्याकडून २१ पुस्तकें गेलीं व त्यांपैकीं 'भारतनेते' व 'सुवर्ण-तुला' या पुस्तकाच्या दोन दोन प्रतींना फिरून मागणी आली. यावरून ब्रिटिश म्युझियम किंवा इंडिया ऑफिस या संस्थांमध्यें मराठी ग्रंथ कसे संगृहीत झाले त्याची कल्पना होईल.

या ज्या प्रती मोफत पाठविल्या जात होत्या त्या कोठें ना कोठें संगृहीत व्हाव्या या हेतूनेंच. संग्रह म्हणजे बऱ्या किंवा वाईट, लहान किंवा मोठ्या प्रत्येक पुस्तकाचा संग्रह व्हावयाला पाहिजे.याच अटीवर केवळ ब्रिटिश म्युझियमला पुस्तकें पाठवावीं. इंडिया ऑफिसचा प्रश्न तर आतां राहिलाच नाहीं. उलट तिकडे गेलेलीं पुस्तकें परत आणण्याचा विचार झाला पाहिजे. १९४८ च्या Indian Independence (Adaptation of Central Acts and Ordinances) Order प्रमाणें या जादा दोन प्रती मध्यवर्ति सरकारकडे पाठविण्याचें ठरलें आहे. त्यांची विल्हेवाट कशी होईल माहीत नाहीं. अलीकडे मुंबई कायदेमंडळांत याविषयीं एक नवा कायदाच पास झाला असून त्याला गव्हर्नर जनरलची मान्यताही मिळाली आहे. (Bombay Govt. Gazette, 3rd Dec. 1948). या

कायद्याप्रमाणें मुद्रकांना तीनऐवजीं यापुढें पांच प्रती एकदम प्रांतिक सरकार सांगेल त्या ग्रंथसंग्रहालयांकडे पाठवाव्या लागतील. पाहा—

"Such number of copies of the book not exceeding five shall also be delivered by the printer, free of expense, to such public libraries as the provincial Government may, by notification in the *Official Gazette*, from time to time specify, within one calendar month after the day on which any such book shall first be delivered out of the press."

परकीय सत्तेखालीं अशा प्रतींची जी दुर्दशा व नाश झाला, तसा प्रकार पुनः स्वराज्यांत होणार नाहीं याबद्दल काळजी घेणें अवश्य आहे. या प्रतींची वांटणी कशी होईल हें अद्याप ठरलेलें दिसत नाहीं. माझ्या मतें त्यांची पुढीलप्रमाणें व्यवस्था व्हावी. ( १ ) प्रांतिक सरकारकडे जाणारी पहिली प्रत सध्यांप्रमाणेंच प्रादेशिक ग्रंथालयांकडे जावी. ( २ ) ब्रिटिश म्युझियम जर एकूण एक प्रत संगृहीत करीत असेल, तर त्याला पूर्वीप्रमाणें ती जरूर पाठवावी. मात्र प्रतिभेटीदाखल इंग्लंडांत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक पुस्तकाची प्रत हिंदुस्थानला मिळाली पाहिजे. ( ३ ) तिसरी प्रत हिंदुस्थानच्या राजनगरींतील म्हणजे दिल्ली येथील ग्रंथसंग्रहालयाला द्यावी. ( ४ ) चौथी प्रत तिच्या भाषेप्रमाणें मुंबईसरकारच्या आश्रयाखालींच चाललेल्या निरनिराळ्या भाषिक संशोधन मंडळांना मिळावी ( ५ ) पांचवी प्रत व वरील संशोधन मंडळांकडे किंवा प्रादेशिक ग्रंथालयांकडे न जाणारीं इंग्रजीसारखीं पुस्तकें मुंबई येथील मध्यवर्ती ग्रंथालयांत संगृहीत व्हावीं. ब्रिटिश म्युझियमची प्रत जर तिकडे संगृहीत होणें अशक्य ठरलें, तर निरनिराळ्या प्रादेशिक विद्यापीठांना मिळावी व इंग्रजी, संस्कृत वगैरे पुस्तकें मुंबई युनिव्हर्सिटीकडे जावीं.

आतां आणखी एका गोष्टीसंबंधीं दोन शब्द लिहून ही लांबलेली प्रस्तावना पुरी करतों. पुष्कळशा ग्रंथालयांच्या चालकांचा ओढा ज्यांना विशेष मागणी आहे अशा लघुकथा, कादंबऱ्यांसारख्या आधुनिक वाङ्मयाचा सांठा करण्याकडे असतो. जुने ग्रंथ विकत घेण्यांत पैसे खर्चणें सोडाच, परंतु असे ग्रंथ संगृहीत करून कपाटाची जागा

अडविणें त्यांच्या जिवावर येतें. अशा वणिग्वृत्तीनें चालविलेलीं ग्रंथालयें हीं ग्रंथालयें नसून दुकानें म्हटलीं पाहिजेत. अशीं ग्रंथसंग्रहालयें राष्ट्राच्या उद्धाराला निरुपयोगी आहेत. राष्ट्रीय ग्रंथालयाचें उद्दिष्ट काय असावें यासंबंधीं ब्रिटिश म्युझियमच्या जनरल कॅटलॉगच्या मुख्य संपादकानें काढलेले उद्गार लक्षांत ठेवण्यासारखे आहेत तो म्हणतो,

"The mission of the national library is the simplest : its character is determined for it by the enactment which in most civilised states constitutes it the general receptacle of the national literature, good, bad, and indifferent and imposes the corresponding obligation of rendering itself the epitome of foreign literatures, as far as its means allow. Every such library is the mirror of its time and perhaps even its services to contemporaries are of less real account than those which it performs for posterity in preserving the image of the past. This is the apology of the librarian's anxiety to collect what the uninitiated regard as trash. Yesterday's news-sheet, waste paper to-day, will be precious after a century, and invaluable after millennium. The same principle justifies the heavy expenditure which it is frequently necessary to occur in procuring what is truly illustrative of the history of a life or a nation, even when it comes in the costly shape of a bibliographical rarity." वगैरे.

आम्ही आतां पूर्वीप्रमाणें गुलाम राहिलों नसून स्वतंत्र झालों आहों. इतर स्वतंत्र राष्ट्रांतील ग्रंथसंग्रहालयांसारखें आपल्या ग्रंथसंग्रहालयांना स्वरूप प्राप्त करून देणें

आपलें कर्तव्य आहे. या कामीं केवळ सरकारी पैसा पुरेसा नसून लोकांमध्येंच ग्रंथांसंबंधीं खरें प्रेम व आस्था निर्माण झाली पाहिजे. त्याशिवाय ग्रंथसंग्रहालयांना ऊर्जितावस्था प्राप्त होणार नाहीं. हक्कांकरितां भांडण्याचे दिवस संपले; आतां कर्तव्याकरितां जागण्याचे दिवस आलेले आहेत. या गोष्टीची जाणीव ज्या वेळीं आपल्या लोकांना होईल, त्या वेळींच आपणांस मिळालेलें स्वातंत्र्य सुस्थिर झालें व सर्वोदयास सुरुवात झाली असें म्हणतां येईल.

मराठी संशोधनमंडळ,
मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय,
ठाकुरद्वार, मुंबई २

अ. का. प्रियोळकर
५।३।४९



## मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांतील

# मराठी दोलामुद्रितें

### १८१०

१ **कॅरे, डब्ल्यु.**-डिक्शनरी ऑफ दि मराठा लँग्वेज. श्रीरामपूर, १८१०. पृष्ठें ८+६५२. (७·३″×४·६″) **४९१·४६३२/कॅरे**

हिंदुस्थानमधल्या युरोपियन लोकांना ही भाषा शिकावयाला मदत व्हावी म्हणून हा कोश वैजनाथ शर्मा यांच्या मदतीनें तयार केल्याचें प्रस्तावनेंत नमूद आहे. मराठी शब्द मोडींत दिले आहेत.

### १८१४

२ **वैजनाथ शर्मा** (भाषांतरकार)-सिंहासनबत्तिशी. श्रीरामपूर, १८१४. पृष्ठें १८३. (७·६″×४·५″) **८९१·४६३/वै. श.**

पुस्तक मोडी टाइपांत छापलें आहे.

### १८२३

३ ......-विदुरनीति. मुंबई, कुरियर छापखाना, १८२३. पृष्ठें २+१२३. (७″×५·३″) **१७०·८/वि. नी.**

"मूळ संस्कृतावरून महाराष्ट्र भाषेंत गद्यरूप करून मुंबई नगरीं कुरियर छापखान्यांत छापिलें असे." विदुरनीतीचे आठ अध्याय देऊन पुढें यक्षप्रश्न हें प्रकरण जोडलें आहे.

### १८२४

४ **केनडी, वॅन्स**-डिक्शनरी ऑफ दि मराठा लँग्वेज इन टू पार्टस्. मुंबई, कुरियर छापखाना, १८२४. पृष्ठें ४+८+४+१२८+४+९७. (१२·४″×७·८″) **४९१·४६३२/ के. वॅ.**

या कोशाचे दोन भाग आहेत. पहिल्या भागांत मराठी शब्दांना इंग्रजी प्रतिशब्द देऊन दुसऱ्या भागांत इंग्रजी शब्दांचे अर्थ मराठींत दिले आहेत. शब्दसंख्या ८००० आहे.

## १८२५

५ **जार्विस, जार्ज**–मुंबईची हैंदशाळा पुस्तकमंडळी ( Bombay Native School Book and School Society ) ग्रंथांचीं भाषांतरें किंवा नवीन ग्रंथ करणारांस बक्षिसाविषयींचें प्रसिध्धि-पत्र. मुंबई, १८२५. पृष्ठें १४+२०+२०. (७·६″×४·४″)

**६५५·५२/ जा. जॉ.**

इंग्रजी, मराठी व गुजराती भाषांत हें प्रसिद्धिपत्र छापलें आहे. बक्षि-साचे नियम, अपेक्षित विषय व इंग्रजी ग्रंथांच्या याद्या दिल्या आहेत.

## १८२६

६ **जार्विस, जार्ज**–गणितकृति अथवा गणितमार्ग. मुंबई, शिळाछाप, १८२६. पृष्ठें ४+१२५. (७·१″×४·३″) **५११·/ जा. जॉ.**

कोष्टकें, बेरीज, वजाबाकी, गुणाकार, भागाकार, त्रैराशिक, सरळव्याज, चक्रवाढव्याज इतके भाग यांत आले आहेत. डॉ. हटनच्या गणितशास्त्रा-वरील इंग्रजी पुस्तकावरून जगन्नाथजी क्रमवंत यांच्या साहाय्यानें हें पुस्तक तयार करण्यांत आलें आहे.

## १८२७

७ **जार्विस, जार्ज**–(भाषांतरकार) शिक्षामाला. मुंबई, शिळाछाप, १८२७. पृष्ठें २+२+२३४+२+२७+२+२१७+२+३१+२+५७+२+४९+२+४९. ( ८·८″×६·८″ ) **५११·/जा. जॉ.**

या पुस्तकांत " बीजगणित, लाग्रतम, आदिकरण भूमिति, बीज-भूमिति, संगतीकरण, सरळ रेघ, त्रिकोण मिति, भूमापन आणि लाग्रतमाचें कोष्टक " आहे. डॉ. हटनच्या मूळ इंग्रजी पुस्तकाचें भाषांतर.

## १८२८

८ **छत्रे, सदाशिव काशीनाथ** ( भाषांतरकार )–इसपनीतिकथा. मुंबई शिक्षामंडळीचा छापखाना, १८२८. पृष्ठें ३१४. (७·२″×५·२″)

**८९१·४६३/छ. स. का.**

मुखपृष्ठ वगैरे प्रारंभींचीं पानें गहाळ आहेत. इसॅाप फेबल्सचें भाषांतर.

९ **जार्विस, जार्ज** ( भाषांतरकार )–गणित वहिवाटवहि आणि नाण्याचे

तपासणीचें वर्तमान. मुंबई, शिळाछाप, १८२८. पृष्ठें २+४+४७०. (८·४″×६″) ५११·/ जा. जॉ.

१० **मॅक्लेनान, जॉन** ( भाषांतरकार )-औषधकल्पनाविधि. मुंबई सरकारी शिळाछापखाना, १८२८. पृष्ठें ४+५+१८४+५०+२+१३३+२. (११″×७.२″) ६१५·१३/ मॅ. जॉ.

पुस्तकाचे एकूण तीन भाग ते आहेत असे—( १ )औषधकल्पनाविधि, ( २ ) धातुऔषधोत्पत्ति, ( ३ ) वनस्पति औषधोत्पत्ति.

## १८२९

११ **क्रमवंत, जगन्नाथशास्त्री** ( संपादक )—महाराष्ट्र भाषेचा कोश. मुंबई, बॉंबे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीचा छापखाना, शिळाछाप, १८२९. पृष्ठांक नाहींत. ( १०″×८·१″) ४९१·४६३/क्र. ज.

प्रस्तावनेंत कोश म्हणजे काय, तो कसा तयार केला, कोणत्या संक्षिप्त शब्दांचा उपयोग कोशांत केला आहे इत्यादि माहिती दिली आहे. हा कोश पुढील मंडळींच्या संयुक्त प्रयत्नांनीं सिद्धीस गेला:—जगन्नाथशास्त्री क्रमवंत, बाळशास्त्री घगवे, गंगाधरशास्त्री फडके, रामचंद्रशास्त्री जन्हवेकर, सखाराम जोशी, दाजीशास्त्री शुक्ल आणि परशुरामपंत गोडबोले.

१२ **जार्विस, जार्ज** ( भाषांतरकार )-विद्येचे उद्देश, लाभ आणि संतोष. मुंबई, शिळाछाप, १८२९. पृष्ठें ५ ते १६९ ( अपूर्ण ) ( ८·३″× ५·३″) ५००·/ज. जॉ.

डॉ. हटनच्या मूळ इंग्रजी ग्रंथावरून जगन्नाथशास्त्री क्रमवंत यांच्या साहाय्यानें हा ग्रंथ तयार केला. विषय एकूण पांच प्रकरणांत मांडला असून शेवटीं पारिभाषिक शब्दांची सूचि दिलेली आहे.

## १८३०

१३ **केपन, डेविड** ( भाषांतरकार )-मराठ्यांची बखर. मुंबई, सरकारी शिळाछापखाना, १८३०. पृष्ठें २+४+२९+४२७+१+४. ( ११″× ७″ ) ९५४·०४/के. डे.

कॅप्टन ग्रँट डफच्या इंग्रजी पुस्तकावरून, बाबा साने यांच्या मदतीनें हा ग्रंथ लिहिला गेला. मुसलमानांच्या आगमनापासून ( इ. स. १००० )

मराठी राज्याच्या अस्तापर्यंत ( इ. स. १८१८ ) महाराष्ट्राचा इतिहास यांत खुलासेवार दिला आहे. मराठी मुखपृष्ठावर प्रकाशनकाल इ. स. १८२९ असा दिला आहे.

## १८३१

१४ ... ...-इंग्रजी भाषणाचे ज्ञान मिळवायासाठीं साह्यकारी. मुंबई, अमेरिकन मिशन प्रेस, १८३१. पृष्ठें १६०. (७·६"×४·९") ४२८·/इं.भा.ज्ञा.

" ह्या देशांतील सर्व, ज्यांस विलायती लोकांशीं कामाचा प्रसंग पडतो, आणि जे बुद्धीस अभ्यास करायासाठीं, विलायती कळा, विद्या समजायास इच्छितात, त्या सर्वांस ही पोथी फार उपयोगी पडेल, " या वाक्यानें पुस्तकाचा उद्देश स्पष्ट होतो.

१५ ... ...-बोधकथा. दुसरी आवृत्ति. पुणें, शिळाछाप, १८३१. पृष्ठें ७२ ( अपूर्ण ). ( ६"×७" ) ८९१·४६३/बो.क.

' मुंबईची शिक्षामंडळी ' यांनीं मुख्यतः विद्यार्थ्यांसाठीं हा ग्रंथ करविला. यांत प्रथम कांहीं मनोरंजक व बोधपर कथा दिल्या असून नंतर दान, जिव्हा, नियमन, सुखाचें मूळ आदि विषयांवर लहानसे निबंध दिले आहेत.

१६ ... ...-सारसंग्रह किंवा शास्त्र, विद्या, कळा, कौशल्यें इत्यादि सर्व विषयांचें संक्षेपतः प्रश्नोत्तर रूपानें वर्णन. मुंबई, शिळाछाप, १८३१. पृष्ठें १४०. (६·१०"×४·३") ००१·/सा. सं.

पदार्थविज्ञान, ज्योतिष, गणित, साहित्य आदि शास्त्रांतील व त्यांच्या पोटविभागांतील सामान्य ज्ञानाचें दिग्दर्शन प्रश्नोत्तररूपानें ३६ प्रकरणांत केलें आहे. शेवटीं ( पृ. १३७-१४० ) शुद्धिपत्र आहे. प्रस्तावनेस प्रस्तावन असें म्हटलें आहे.

१७ **ऋमवंत, जगन्नाथशास्त्री** ( संपादक )-महाराष्ट्र भाषेचा कोश, पुरवणी. मुंबई, बॅांबे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीचा छापखाना, शिळाछाप, १८३१. पृष्ठांक दिलेले नाहींत. ( १०·७"×८·५" ) ४९१·४६५/ऋ.ज.

पहिल्या दोन भागांत राहिलेले शब्द या पुरवणींत दिलेले आहेत.

## १८३२

१८ ... ...–इंग्लंड देशाची बखर. पुणें, १८३२. पृष्ठें ४६८ (अपूर्ण). ( ७·२"×४·५" ) ९४२·/इं. दे. ब.

ज्युलियस सीझरच्या स्वारीपासून एलिझाबेथ राणीच्या कारकीर्दी-पर्यंतच्या कालखंडांतील इंग्लंडचा इतिहास हकीगतीसारखा सांगितला आहे. या प्रतींत प्रास्ताविक व ४६८ नंतरचीं पृष्ठें गहाळ आहेत.

१९ ... ...–भूगोल आणि खगोल इत्यादिविषयक संवाद. पुणें, सरकारी शाळाखात्याचा छापखाना, शिळाछाप, १८३२. पृष्ठें २+२५०+४. ( ८"×५" ) ९१०·/भू. ख. सं.

'मुंबई शिक्षामंडळी' ( बाँबे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटी ) यांच्या-करितां सरकारी शाळाखात्याच्या छापखान्यांत हा ग्रथ छापला. हा ग्रंथ प्रश्नोत्तर स्वरूपांत असून भूगोल आणि खगोल वर्णनाशिवाय मुसलमानी व इंग्रजी अमलाचा त्रोटक इतिहासहि यांत आहे.

## १८३३

२०... ...–त्रिविद्या त्रिगुणात्मिका. मुंबई, अमेरिकन मिशन छाप-खाना, शिळाछाप, १८३३. पृष्ठें ६०+५६. ( ४"×५·५" )
२९४·११/त्रि. त्रि.

ऋग्वेदांतील पहिल्या मंडलाचें मूळ संस्कृतासह मराठी भाषांतर व नंतर इंग्रजी भाषांतर दिलें आहे.

२१ ... ...–मराठी बोधवचनें. आवृत्ति चवथी. मुंबई, आर. प्रेरा ( मुद्रक ), शिळाछाप, १८३३ पृष्ठें ४८ ( अपूर्ण ). ७·७"×४·५" )
१७०·८/म. बो. व.

इंग्रजी बोधवचनांवरून हीं भाषांतरित केलीं असावींत असे रचनेवरून वाटते. एका बाजूस बाळबोधींत व दुसऱ्या बाजूस मोडींत अशीं हीं वचनें छापलीं आहेत.

२२ **स्टिव्हन्सन, जे. ( रे. )**–इंग्लिश भाषेच्या व्याकरणाची मूळपीठिका. आवृत्ति दुसरी. मुंबई, शिळाछाप, १८३३. पृष्ठें २+१२७+१. ( ११·"५×७·१" ) ४२५·/स्टि. जे.

मुंबईच्या स्कॉटिश मिशनच्या अधिकारी पंडितानें हें पुस्तक लिहिलें आहे.

## १८३४

२३ ... ...–विदुरनीति. मुंबई, न्यू बॉंबे लिथोग्राफिक छापखाना, शिळाछाप, १८३४. पृष्ठें ४+९५. ( ७·२″×५·६″ ) १७०·८/वि. नी.

मूळ संस्कृतवरून हें भाषांतर केलें आहे. विदुरनीतिशिवाय यांत यक्षप्रश्नहि दिलेले आहेत.

## १८३५

२४ ... ...–गणित शास्त्राच्या उपयोगाविषयींचे संवाद. मुंबई, दर्पण छापखाना, १८३५. पृष्ठें ४+२३. ( ७·१″×४·९″ )

**५१०·/ग. शा. मा.**

'एलफिन्स्टन कॉलेज मुंबई' येथें दर्शनानुशास्त्र, जलशास्त्र, शिल्पशास्त्र, शुद्धगणित, ज्योतिषशास्त्र या विषयावर इंग्रजीमध्यें व्याख्यानें झालीं त्यांचें मराठी भाषांतर यांत दिलें आहे.

२५ **नाना नारायण**–इंग्लंड देशाचें वर्णन. मुंबई, शिळाछाप, १८३५. पृष्ठें ४+१०५+६. ( ८·२″×५·४″ ) **९१४·२/ना. ना.**

या पुस्तकांत प्रथम ज्ञानापासून होणारे लाभ वर्णन केले असून नंतर इंग्रजी संस्कृति व लोकस्थिति वर्णन केली आहे.

२६ **फॅरार ( मिसेस )** ( भाषांतरकार )—कुटुंबप्रवर्तननीति. नासिक, शिळाछाप, १८३५. पृष्ठें १०+५६. ( ७·७″×४·९″ ) **१७३·/फॅ.**

अर्पणपत्रिकेंत हा ग्रंथ हिंदूंना त्यांच्या मुलांच्या प्रतिपालनाच्या आणि शिक्षणाच्या कामीं उपयोगी होईल असें म्हटलें आहे.

२७ **बेल, विल्यम हेन्री** ( भाषांतरकार )––शिल्पविद्या या विषयाचे निबंध. मुंबई, शिळाछाप, १८३५. पृष्ठें ४+४+३०४. ( ८·८″×६·७″ )

**५३१·/बे. वि. हे.**

श्री. बेल यांनीं हे निबंध इंग्रजींतील Treatises on Mechanics वरून, नारायणशास्त्री चौलकर, यांच्या साहाय्यानें तयार केले. 'उपयोगी ज्ञानाचा पुस्तकसमूह' मालेपैकीं हें एक पुष्प आहे.

२८ **विल्सन ( मिसेस )**–मेदी आणि पार्शी लोकांचें वृत्तांतकथन. मुंबई, शिळाछाप. १८३५. पृष्ठें २+४२ (अपूर्ण). (७·१″×५″) ९३०·/वि.

कास्पियन समुद्राच्या दक्षिण तीरावर मेदीया नांवाचा देश होता. तेथें इसवी सनापूर्वी सहाव्या शतकापर्यंत कांहीं राजवंश राज्य करीत होते. त्यांपैकीं कांहीं राजांच्या कृत्यांचें वर्णन पहिल्या प्रकरणांत देऊन उरलेल्या प्रकरणांत पार्शी ( इराणी ) लोकांच्या इतिहासाचें शिकंदरानें तो देश जिंकीपर्यंतच्या काळाचें वर्णन केलें आहे.

## १८३६

२९ **तर्खडकर, दादोबा पांडुरंग**–मराठी भाषेचें व्याकरण. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, शिळाछाप, १८३६. पृष्ठें १९२ ( अपूर्ण ). ( ८″×५″ ) ४९१·४६५/त.दा.पां.

श्री. प्रियोळकर यांच्या मराठी व्याकरणाची कुळकथा या पुस्तकांतील मूळ ग्रंथाच्या मुखपृष्ठाचें छायाचित्र व दादोबांची प्रस्तावना अशीं चार पानें या प्रतीस जोडण्यांत आलीं आहेत त्यांनीं मूळ ग्रंथाचें स्वरूप कळण्यास मदत होते.

३० **फडके, गंगाधरशास्त्री**–महाराष्ट्र भाषेचें व्याकरण. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८३६. पृष्ठें २+१२+१५२. (५·४″×३·८″) ४९१·४६५/फ. गं.

मुंबई शिक्षामंडळीचे अधिकारी जॉर्ज जर्विस यांच्या सूचनेवरून संस्कृत व्याकरणाच्या धर्तीवर, प्रश्नोत्तर रूपानें हें व्याकरण लिहिलें आहे. पुणें प्रांतीं बोलली जाणारी मराठी ही प्रमाणभूत मानली आहे.

३१ **सुबाजी बापु**–सिद्धांतशिरोमणिप्रकाश. मुंबई, आर. प्रेरा ( मुद्रक ), शिळाछाप, १८३६. पृष्ठें २+१२९+१. ( ७·६″×५·४″ ) ५२०·/सु. बा.

भोपाळ जवळ सेहोर येथें राहणाऱ्या या पंडितानें हिंदु ज्योतिषशास्त्राची कांहीं विधानें खोडण्याचा प्रयत्न केला आहे.

## १८३७

३२ ... ...–सारसंग्रह किंवा शास्त्रें, विद्या, कळा, कौशल्यें इत्यादि सर्व

विषयांचें संक्षेपतः प्रश्नोत्तररूपानें वर्णन. आवृत्ति दुसरी. मुंबई, शिळा-छाप, १८३७. पृष्ठें ९२. ( ६·५"×४·२" ) ००१·/सा.सं.

या पुस्तकाची पहिली आवृत्ति १८३१ मध्यें छापली होती. या आवृत्तीच्या मुखपृष्ठाच्या मागील बाजूस आर. प्रेरा यानें छापिलें हा मजकूर इंग्रजींत असून मुद्रणकाल १८३६ दिला आहे.

३३ **वसईकर, राघोबा जनार्दन** ( भाषांतरकार )–मरे याच्या इंग्रजी व्याकरणाचा संक्षेप. मुंबई, दर्पण व गणपत कृष्णाजी छापखाना, शिळाछाप, १८३७. पृष्ठें ९+२३०+४+२+४. ( ६·८"×५·४" ) ४२०·/व.रा.ज.

मरेचें इंग्रजी व्याकरण संक्षेपानें एका बाजूस देऊन त्याचेंच मराठी भाषांतर दुसऱ्या बाजूस छापिलें आहे. इंग्रजी मजकूर दर्पण छापखान्यांत व मराठी गणपत कृष्णाजी छापखान्यांत छापला आहे.

३४ **हरि केशवजी**–रसायनशास्त्रविषयक संवाद. मुंबई, आर. प्रेरा छापखाना, शिळाछाप, १८३७. पृष्ठें १८+४७८+६. (१०·४"×७·१") ५४०·/ह. के.

रसायनशास्त्रांतील विषयांची माहिती, उपकरणें व प्रयोग यांच्या आकृति देऊन दिली आहे. एकंदर २५ संवादांत विषय मांडला आहे.

## १८३८

३५ ... ...–महाराष्ट्र भाषेचें क्षेत्रफळ घनफळ मुलांकरितां. मुंबई, आर. प्रेरा छापखाना, शिळाछाप, १८३८, पृष्ठें ५६. (७·९"×६") ५११·८/ म. क्षे. घ.

मुंबई शिक्षामंडळी या संस्थेनें करविलेलें महत्त्वमापनाचें पाठपुस्तक आकृति देऊन व उदाहरणें सोडवून दाखवून विषय जास्त स्पष्ट केला आहे.

३६ **फॅरार, सी. पी. ( रे )**–गीतें. विभाग दुसरा. नासिक, गणपत कृष्णाजी छापखाना, शिळाछाप, १८३८. पृष्ठें २+९८ ( ८·३"×५" ) २२३·२/ फ.

Psalms of David यांच्या भाषांतराचा हा दुसरा भाग आहे. आर्या, श्लोक, अभंग, गीतें इत्यादि ५६ ते १०५ क्रमांकपावेतों आहेत.

३७ **फॅरार (मिसेस)**–यात्रेकऱ्याचा वृत्तांत. नासिक, शिळाछाप, १८३८. पृष्ठें १४६. (६·३″×४″) **२४४३·/ फॅ.**

ख्रिस्ती धर्माच्या प्रचारात्मक गोष्ट.

३८ **विल्सन (मिसेस)**–आशुरी आणि बाबेली लोकांचें वृत्तांतकथन. आवृत्ति दुसरी. मुंबई, शिळाछाप, १८३८. पृष्ठें ६० (अपूर्ण). (६·५″×३·९″) **९३०·/ वि.**

प्राचीन काळच्या असीरियन व बाबिलोनियन या लोकांचा इतिहास.

३९ **विल्सन (मिसेस)**–ग्रेकी लोकांचें वृत्तांतकथन, प्रकरण पहिलें, अथेनाइनकरांविषयीं. आवृत्ति दुसरी. मुंबई, शिळाछाप, १८३८. पृष्ठें ६४. (६·६″×३·९″) **९३०·/ वि.**

जुन्या ग्रीक इतिहासांतील अथेन्स शहराविषयींचें वर्णन संक्षेपानें दिलें आहे.

४० **विल्सन (मिसेस)**–मेदी आणि पार्शी लोकांचें वृत्तांतकथन. आवृत्ति दुसरी. मुंबई, शिळाछाप, १८३८. पृष्ठें ४८ (अपूर्ण). (६·५″×३·९″) **९२०·/ वि.**

या पुस्तकाची १ ली आवृत्ति १८३५ सालीं प्रसिद्ध झाली होती.

४१ **हरि केशवजी** (भाषांतरकार)–इंग्लंडाचा वृत्तांत. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, शिळाछाप, १८३८. पृष्ठें १२+२ (नकाशे)+२८२+१. (८·३″×५·३″) **९४२·/ ह. के.**

'एका गृहस्थानें आपल्या मुलांस इंग्रजी पत्रांतून हा इतिहास सांगितला त्याचें हें भाषांतर होय.' प्रत्येक पत्राशेवटीं प्रश्न दिले आहेत. युरोपचा एक व ग्रेट ब्रिटन आणि आयर्लंड यांचा एक असे दोन नकाशे प्रथम दिले आहेत.

४२ **जोशी, (चिपळोणकर,) बापू गंगाधर**–निघंटप्रकाश. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, शिळाछाप, १८३९. पृष्ठें ५ ते ४२७ व १ ते २१४ (अपूर्ण). (८·८″७·१″) **६१०·/जो. बा. गं.**

पहिल्या भागांत आर्यवैद्यकशास्त्रांत आलेल्या वनस्पति इत्यादींचा कोश दिला असून दुसऱ्या भागांत या वनस्पतींचे गुणधर्म सांगितले आहेत. या

प्रतींत मूळ पुस्तकापैकीं वनस्पतिकोश आणि कोशगुणदोष हे दोनच भाग आहेत.

४३ **बाळाजी सुंदरजी**—भावचंद्रिका (श्रीकृष्णार्जुनसंवाद). मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, शिळाछाप, १८३९. पृष्ठें ४+१३१+१ (८·५"×५·४") **१८१·४५६/बा. सुं.**

रामचंद्रशास्त्री मुंडले यांच्या साहाय्यानें गीतेचें हें भाषांतर तयार केलें आहे.

४४ **विल्सन (मिसेस)**–प्राचीन मिश्री लोकांचें वृत्तांतकथन. आवृत्ति दुसरी. मुंबई, शिळाछाप, १८३९. पृष्ठें ८०. (६·५"×३·९") **९३०·/ वि.**

प्राचीन इजिप्शियन लोकांचा इतिहास तीन प्रकरणांत दिला आहे. या प्रतींत पृष्ठें सात ते दहा गहाळ झालीं आहेत.

## १८४०

४५ ... ...–ज्ञानचंद्रोदय (मासिक). ग्रंथ एक, कागद एक (कार्तिक १७६२). मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, शिळाछाप, १८४०. पृष्ठें ४+६. (७·७"×५·८") **०५९·१४६/ ज्ञा. चं.**

या प्रतींत कृष्णलीलामृत अध्याय एक, दोन, तीन, एकूण ओव्या ३४४ हा मुख्य विषय गहाळ आहे. सचित्र मुखपृष्ठ, आश्रयदात्यांची यादी व नीति, भक्ति, ज्ञान यांवरील श्लोक व त्यांचे अर्थ मात्र या पृष्ठांत आहेत.

४६ **दात्ये, रघुनाथशास्त्री** (भाषांतरकार)–शालिवाहन चरित्र. मुंबई, अमेरिकन मिशन प्रेस, शिळाछाप, १८४०. पृष्ठें २+१३+२५. (६·८"×४·६") **८९१·४६३/दा.र.**

प्रस्तावनेंत महंमद व ख्रिस्त यांची शककर्ते म्हणून त्रोटक चरित्रें सांगितलीं आहेत. पैठणला सांपडलेल्या संस्कृत पोथीवरून हा ग्रंथ केला आहे.

४७ **लिमये, कुशाभाऊ** (भाषांतरकार)–महाराष्ट्र देशाचें वर्णन आणि इतिहास यांचा प्रश्नोत्तरावलिरूप ग्रंथ. पुणें, विश्रामबागवाडा छापखाना, शिळाछाप, १८४०. पृष्ठें ४×७८. (८·४"×५·२") **९५४·/लि. कु.**

ग्रँटडफच्या इतिहासावरून मि. इजदेल यांनीं शालोपयोगी इतिहास लिहिला त्याचें भाषांतर विश्रामबाग शाळेंतील विद्यार्थी श्री. लिमये यांनीं केलें आहे.

४८ ... ...–पुनर्विवाहप्रकरण. शिळाछाप, १८४१. पृष्ठें १२+४०+८+१०+४. (५·८″×३·७″) **३९२·/पु. वि. प्र.**

हें पुस्तक पुनर्विवाहाच्या समर्थनार्थ लिहिलें असून पोथीप्रमाणें आडवें छापिलें आहे.

४९ ... ...–प्रभाकर (साप्ताहिक). मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८४१-४२. पृष्ठें (भिन्न) (१०·३″×७·८″) **०५९·१४६/ प्र.**

प्रभाकर साप्ताहिकाचे २१ नोव्हेंबर १८४१ पासून २३ आक्टोबर १८४२ पर्यंतचे अंक एकत्र बांधले आहेत.

५० **राजवाडे, बाळकृष्ण भिकाजी** (भाषांतरकार)–आशौचविचार. मुंबई, शिळाछाप, १८४१. पृष्ठें २+५६. (७·″६×४·७″)
**२९४·२४२७४/ रा. बा. भि.**

आशौचासंबंधींच्या धर्माज्ञेचें पालन कसोशीनें व्हावें व लोकांना पाप लागूं नये या धार्मिक बुद्धीनें, मिताक्षरा, पाराशर माधव, प्रायश्चित्त-मयूख, आशौचशेखर, आशौचप्रकाश, धर्माब्धि, निर्णयसिंधु आदि ग्रंथांच्या आधारें संवादरूपानें हा ग्रंथ लिहिला आहे.

५१ **हरि केशवजी** (भाषांतरकार)–यात्रिक क्रमण, इहलोकापासून परलोकास. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, शिळाछाप, १८४१. पृष्ठें ३७५+१६ (८·३″×५·१″) **८९१·४६३/ ह. के.**

जॉन बनियनच्या 'पिलग्रिम्स प्रोग्रेस'चें भाषांतर. ग्रंथाच्या शेवटीं बायबलांतील संदर्भांचें दिग्दर्शन केलें आहे.

५२ **हरिदास**–विक्रमचरित्र. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, शिळाछाप, १८४१. पृष्ठें अध्यायानुसार भिन्न. (७·९″×५·६″) **८९१·४६३/ ह.**

ओवीबद्ध १८ अध्यायांत हें चरित्र सांगितलें आहे. पुस्तक पोथीसारखें छापलें आहे.

## १८४२

५३ ... ...—सारसंग्रह किंवा शास्त्रें, विद्या, कला, कौशल्यें इत्यादि सर्व विषयांचें संक्षेपतः प्रश्नोत्तररूपानें वर्णन. आवृत्ति दुसरी (तिसरी ?). पुणें, सरकारी पाठशाळा छापखाना, शिळाछाप, १८४२. पृष्ठें २+२+७५. ( ८″×६·२″ ) ००१·/ सा. सं.

मुखपृष्ठावर "आवृत्ति दुसरी" असें छापिलें आहे. परंतु दुसरी आवृत्ति १८३७ सालींच निघाली असल्यानें ही आवृत्ति तिसरी असावी.

५४ **पांडुरंग गणोबा** ( भाषांतरकार )–सृष्टिजन्य ईश्वरज्ञान. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, शिळाछाप, १८४२. पृष्ठें ८+४+३४९+४. ( ८·३″×५·२″ ) २१०·/पां. ग.

रे. गॅलादे (Gallaudet) यांच्या दि युथस् बुक ऑन नॅचरल् थिऑलाजी या ग्रंथाचें हें मराठी भाषांतर आहे. एक आई आपल्या मुलाला सृष्ट पदार्थ व प्राणी यांवरून परमेश्वराचें स्वरूप संवादरूपानें शिकविते अशी या पुस्तकाची भूमिका आहे. भाषांतर रामचंद्रशास्त्री मुंडले यांच्या मदतीनें तयार केलें आहे.

५५ **वामनपंडित**–ब्रह्मस्तुतीची टीका. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, शिळाछाप, १८४२. पृष्ठें १८+२+३८+२+१६+२. (७·७″×५·४″) ८९१·४६१/रा.

या पोथीचे एकूण तीन अध्याय आहेत.

## १८४३

५६ ... ...–भाषामंजरी. मुंबई, ज्ञानसिंधु छापखाना, शिळाछाप, १८४३. पृष्ठें २+११३. ( ८·५″×५·५″ ) ४९१·२८/ भा. मं.

सोपी संस्कृत वाक्यें मराठी अर्थासह दिलीं आहेत.

५७ **रामकृष्ण विश्वनाथ**–हिंदुस्थानची प्राचीन व सांप्रतची स्थिति व पुढें काय त्याचा परिणाम होणार, याविषयीं विचार. मुंबई, प्रभाकर छापखाना, शिळाछाप, १८४३. पृष्ठें २+१०६. ( ८″×५·१″ ) ३२९·९५४/ रा. वि.

हिंदुस्थानचा इतिहास संक्षेपानें देऊन तत्कालीन (१८४३) समाजस्थितीवर निर्भीड विचार मांडले आहेत. सहकारी तत्त्वांवर व्यापार, उद्योगधंदे वगैरे चालवावे अशी सूचना केली आहे.

## १८४५

५८ ... ...–शुभवर्तमानासंबंधीं प्रश्नोत्तरावळी. मुंबई, अमेरिकन मिशन छापखाना, १८४५. पृष्ठें ३५. (७·२″×४·१″) २२६·/शु. प्र.

ख्रिस्तासंबंधीं मराठी व इंग्रजी शुभवर्तमानें समोरासमोरच्या पानांवर दिलीं आहेत.

५९ **लेले, सदाशिव अनंतशास्त्री**–संस्कृत वाक्यरत्नावलि. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, शिळाछाप, १८४५. पृष्ठें ५+१३४+२४+४. (८·१″×४·७″) ४९१·२८/ले.स.अ.

संस्कृत आल्यानें इंग्रजी अगर दुसरी कोणतीही भाषा शिकण्यास सुलभ जातें म्हणून हा ग्रंथ केला असें लेखक म्हणतो. संस्कृत शब्दांचा मराठी अर्थासह कोश शेवटीं दिला आहे.

६० **केपन, डेविड (भाषांतरकार)**–बखर मराठ्यांची. आवृत्ति दुसरी, पूर्वार्ध, पुणें, विश्रामबाग पाठशाळा छापखाना, शिळा छाप, १८४६. पृष्ठें ८+२०+३१९. (८.८″×५.७″) ९५४·०४/के. डे.

या पुस्तकाची १ ली आवृत्ति १८३० सालीं प्रसिद्ध झाली. या आवृत्तींत मूळ पुस्तक पूर्वार्ध व उत्तरार्ध अशा दोन भागांत छापलें आहे. हा पूर्वार्ध होय.

६१ **जांभेकर, बाळशास्त्री**–हिंदुस्थानचा इतिहास. मुंबई, वि. स. अग्निहोत्री छापखाना, शिळाछाप, १८४६. पृष्ठें ४+१६४. (८.१″×५.२″) ९५४·/जां. बा.

एलफिन्स्टनच्या मूळ पुस्तकाचा संक्षेप व भाषांतर करून हा ग्रंथ केला आहे. १७६१ (पानपतचें युद्ध) पर्यंतचाच इतिहास दिला आहे.

६२ **हरि केशवजी (भाषांतरकार)**–चेंबर्सकृत शालोपयोगी नीतिग्रंथ. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, शिळाछाप, १८४६. पृष्ठें २+८+२२६ +१. (८·८″×५·७″) १७०·४/ह. के.

या पुस्तकांत मनोरंजक गोष्टी व सुबोध निबंध यांच्या साहाय्यानें नीतितत्त्वांचें व व्यवहारज्ञानाचें शिक्षण विद्यार्थ्यांना दिलें आहे. चेंबर्सकृत 'मॅारल क्लासबुक चें हें भाषांतर होय.

## १८४७

६३ ... ...-सिंहासनबत्तिशी. मुंबई, देवळेकर हेंगिष्टे छापखाना, शिळाछाप, १८४७. पृष्ठें १ (चित्र)+८४. (७·७″×५·४″)
८९१·४६३/सिं. व.

विक्रमराजाविषयींच्या अद्भुत गोष्टींचा संग्रह.

६४ **कँडी, टी**-ए डिक्शनरी, इंग्लिश अँड मराठी. मुंबई, अमेरिकन मिशन छापखाना, १८४७. पृष्ठें २+१९+२+८३८. (१०·७″×८·४″)
४२३·/कॅ. टी.

मोल्सवर्थनें हें कोश करण्याचें काम सुरू केलें परंतु त्यांची पूर्तता मेजर कँडी यांनीं केली. प्रस्तावनेंत त्यांच्या कामाचें स्वरूप वर्णन केलें आहे. दोन्ही भाषांवर एक तुलनात्मक प्रबंध जे. एस. (स्टिव्हन्सन) या नांवावर ग्रंथारंभीं दिला आहे.

६५ **नामदेव**-शिवरात्री महात्म्याचे अभंग. आवृत्ति ३ री (सचित्र). मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, शिळाछाप, १८४७. पृष्ठें ४+४४ (६·१″×४·२″)
८९१·४६१/ ना.

## १८४८

६६ ... ...-लावण्या रागदारीच्या आणि साध्या तालसुद्धां. भाग १ ला. मुंबई, वि. स. अग्निहोत्री छापखाना, शिळाछाप, १८४८. पृष्ठें ४+१४०. (८·९″×५·६″)
८९१·४६१/ ला.

प्रभाकर, होनाजीबाळ, सगनभाऊ वगैरे जुन्या शाहिरांच्या लावण्यांचा संग्रह.

६७ **क्रमवंत, जनार्दन भास्करभट**-ज्योतिषसार. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, शिळाछाप, १८४८. पृष्ठें २+२+८+१४६+८३+१. (८·९″×५·६″)
१५९·९६१५३ /क्र. ज. भा.

हा ग्रंथ संस्कृतमधील ज्योतिषसार, मुहूर्तमार्तंड, रत्नकोश, सिद्धांतशिरोमणि वगैरे मूळ संस्कृत ग्रंथांतील श्लोक घेऊन रचलेला आहे.

६८ **जार्विस, जॉर्ज रिटसो** ( भाषांतरकार )–ड मार्गन याचा बीजगणित मूळपीठिका याचें मराठी भाषांतर. मुंबई, शिळाछाप, १८४८. पृष्ठें ८+३८६+१ ( ९·५″×६″ ) **५१२·/ जा. जॉ.**

या भाषांतराच्या कामीं विष्णु सुंदर छत्रे, गंगाधरशास्त्री फडके आणि गोविंद गंगाधर फडके यांचें साहाय्य झालें.

६९ **फ्लिच, जेम्स** ( भाषांतरकार )–भाषण. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, शिळाछाप, १८४८. पृष्ठें ८+६+४३. ( ६·८″×४·१″ ) **३७०·४/ फ्लि. जे.**

मुंबई येथील ' एलफिन्स्टन इन्स्टिटयुशन ' या शाळेची वार्षिक परीक्षा २५–४–१८४८ रोजीं झाली. त्या वेळीं संस्थेचे अध्यक्ष सर अर्स्किन पेरी यांनीं इंग्रजींत भाषण केलें त्याचा मराठी सारांश.

७० **माधवराव मोरोजी**–वाचण्याकरितां मराठी भाषेंत विद्योपक्रमाचा ग्रंथ. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, शिळाछाप, १८४८. पृष्ठें १२+८+३७४. ( ८·४″×५·२″ ) **४९१·४६८६/मा. मो.**

या ग्रंथाच्या पूर्ततेस नाना मोरोबा यांनीं हातभार लावला आहे. इंग्रजींतील ' मकलक्स कोर्स ऑफ एलिमेंटरी रीडिंग ' या पुस्तकाच्या धर्तीवर हा ग्रंथ निर्माण करण्याचा प्रयत्न केला आहे असें प्रस्तावनेंत म्हटलें आहे. विद्या, कला, इतिहास व नीति या विषयांवर जे ग्रंथ लेखकास उपलब्ध झाले त्यांचा उपयोग त्यानें ग्रंथरचनेच्या कामीं केला आहे.

७१ **मोरोपंत**–दशमस्कंध ( आर्या ). मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, शिळाछाप, १८४८. पृष्ठें १११. ( ८·३″×५·२″ ) **८९१·४६१/मो.**

भागवताच्या दशमस्कंधांत वर्णलेल्या प्रसंगांवर या आर्या केल्या आहेत. हें पुस्तक पोथीच्या स्वरूपांत छापलें आहे.

## १८४९

७२ **जांभेकर, बाळशास्त्री**–हिंदुस्थानांतील इंग्लिशांच्या राज्याचा इतिहास.

मुंबई, अमेरिकन मिशन छापखाना, १८४९. पृष्ठें २६+२७४+१ ( नकाशा ). ( ७·८″×४·९″ ) ९५४·/जां.बा.

इंग्रजींत या विषयावर जे ग्रंथ होते, त्यांवरून जांभेकरांनीं हा ग्रंथ लिहिला व मेजर कँडी यांनीं तो सुधारून छापला. युरोपियनांच्या आगमनापासून १८४४ पर्यंतचा इतिहास यांत आला आहे.

७३ **माडगांवकर, गोविंद नारायण**–शुचिर्भूतपणा. मुंबई, अमेरिकन मिशन छापखाना, १८४९. पृष्ठें ४३. ( ७·२″×४·४″ ) ६१३·/मा.गो.ना.

या छोट्याशा पुस्तकांत पांच प्रकरणे असून त्यांत अनुक्रमें घर, शरीर, अन्न, वस्त्रें व मन यांची शुद्धता कशी व कां राखावी तें सोप्या भाषेंत सांगितलें आहे.

## १८५०

७४ ... ...–इंग्लंड देशाची बखर. भाग एक याची पुनरावृत्ति. पुणें. विश्रामबागवाडा छापखाना, शिळाछाप, १८५०. पृष्ठें ४+३६९. ( ७·७″×५·२″ ) ९४२·/इं. ब.

१८३२ सालीं प्रसिद्ध झालेल्या पुस्तकाची पुनरावृत्ति.

७५ ... ...–जगांतराविषयीं ( विद्यार्थी प्रकरण पांचवें ). मुंबई, अमेरिकन मिशन छापखाना, १८५०. पृष्ठें ३३. ( ५·६″×३·५″ ) ५२०·/ज.वि.

निरनिराळे ग्रह व तारे यांचे आकारमान व त्यांचें पृथ्वीपासून असलेलें अंतर यांचें वर्णन करून हे खगोल म्हणजे दिव्यलोक व पृथ्वी हें पतितांचें स्थान असून येथील पतितांना तारण्यासाठीं ख्रिस्ताचा जन्म झाला असें सांगितलें आहे. अमेरिकन मिशन सिरीजपैकीं नं. ५२ चें पुस्तक.

७६ ... ...–भर्तृहरिकृत नीतिशतक. मुंबई, गुरुप्रसाद छापखाना, शिळाछाप, १८५०. पृष्ठें ४५. ( ७·९″×६″ ) ८९१·४६१/भ. नी.

भर्तृहरिकृत नीतिशतकाचें मराठी गद्यात्मक भाषांतर मूळ श्लोकांसह दिलें आहे.

७७ ... ...–मराठी ज्ञानप्रसारक ( मासिक ). वर्ष एक व दोन. मुंबई,

गणपत कृष्णाजी छापखाना, एप्रिल १८५० ते मार्च १८५२. पृष्ठें भिन्न. ( ८·२″×५·३″ ) ०५९·१४६/म. ज्ञा. मा.

मुंबईंत 'एलफिन्स्टन विद्यालयांत' 'उपयुक्त ज्ञानप्रसारक' या नांवाची सभा १८४८ मध्यें स्थापन झाली होती. तींतील सदस्यांनीं वाचलेले निबंध व दिलेलीं व्याख्यानें यांत छापलीं आहेत. विषय धार्मिक व राजकीय सोडून इतर निरनिराळे आहेत. या सभेत दादोबा पांडुरंग, महादेव गोविंद आदि तत्कालिन प्रसिद्ध विद्वान होते. प्रथम सभेचे नियम वगैरे दिले आहेत.

७८ ... ...–लेखनपद्धतीचें बुक. पुणे, ज्ञानप्रकाश छापखाना, शिळाछाप, १८५०. पृष्ठें ७३; ( ७·१″×५·४″ ) ६५१·७/ले.प.बु.

लोकांनीं परस्परांस पत्रें लिहितांना माने ( मायने ) काय लिहावे हें विद्यार्थ्यांस समजावें म्हणून हें पुस्तक लिहिलें गेलें. मायन्याव्यतिरिक्त करारपत्रांचे मसुदेहि यांत दिले आहेत.

७९ **अष्टपुत्रे, भाऊशास्त्री**–गायनप्रकाश. पुणें, ज्ञानप्रकाश छापखाना, शिळाछाप, १८५०. पृष्ठें ८+११३ ( सचित्र ). ( ७·२″×५·४″ ) ७८०·/ अ.भा.

गायनशास्त्रांतील सामान्य माहिती प्रथम देऊन निरनिराळ्या रागरागिण्यांच्या आकृती, चित्रें व गीते दिलीं आहेत.

८० **तर्खडकर, दादोबा पांडुरंग**–महाराष्ट्र भाषेचें व्याकरण. आवृत्ति दुसरी. मुंबई, अमेरिकन मिशन छापखाना, १८५०. पृष्ठें १२+४+३३८+४. ( ७·८″×४·९″ ) ४९१·४६५/त.दा.पां.

आरंभींचीं चार पानें गहाळ आहेत.

८१ **फडके, गंगाधरशास्त्री**–महाराष्ट्र भाषेचें व्याकरण, आवृत्ति चौथी. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८५०. पृष्ठें ४+५+१५८. ( ६·२″×३·७″ ) ४९१·४६५/ फ. गं.

१८३६ सालीं छापलेल्या व्याकरणाची ही सुधारून वाढविलेली चौथी आवृत्ति आहे.

८२ **बार्थ, सी. जी.**–खिस्ती मंडळीची बखर. मुंबई, अमेरिकन मिशन छापखाना, १८५०. पृष्ठें ४+२६०. (८·९″×६·२″) **२७०·/बा.सी.जी.**

येशूच्या जन्मापासून १८३५ पर्यंतचा खिस्ती धर्माचा इतिहास एकूण २७ अध्यायांत वर्णन केला आहे. प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं प्रश्न दिले आहेत.

८३ **मॅक्डोनाल्ड (कॅ.) आर्चिबाल्ड,** (भाषांतरकार)–गुजरात देशाचा इतिहास. मुंबई, आपा रामजी कारखाना, १८५०. पृष्ठें ६+३०३. (८·७″×५·४″) **९५४·७२/मॅ. अ.**

जेम्स बर्डनें अली महंमदखान याच्या फारशी ग्रंथाचें इंग्रजी भाषांतर केलें त्याचें हें मराठी भाषांतर होय.

८४ **माडगांवकर, गोविंद नारायण**–ऋणनिषेधक बोध. मुंबई, डेक्कन व्हर्नाक्युलर सोसायटी, शिळाछाप, १८५०. पृष्ठें २+७०. (८·८″× ५ ४″) **३३९·/मा. गो. ना.**

कर्जाविषयीं मूलगामी विचार मांडून कर्ज होण्याची कारणें देऊन व कर्जबाजारी लोकांचीं उदाहरणें देऊन विषय सोप्या भाषेंत सुबोध रीतीनें मांडला आहे.

८५ **हरि केशवजी** (भाषांतरकार)–शालोपयोगी नीतिग्रंथ. मुंबई, अमेरिकन मिशन छापखाना, १८५०. पृष्ठें ११+२७१. (७″×४″) **१७०·४/ह. के.**

१८४६ सालीं छापलेल्या पुस्तकाची ही २ री आवृत्ति असावी, परंतु तसा उल्लेख केलेला नाहीं.

## १८५१

८६ ... ...–ए मराठी अँड इंग्लिश व्होकॅब्युलरी. मुंबई, अमेरिकन मिशन छापखाना, १८५१. पृष्ठें १२+१५९. (८·३″×५·४″) **४९१·४६३२/ म.इं.व्हो.**

केनेडीचा कोश आधार म्हणून घेऊन व मोल्स्वर्थ–कोशाचा उपयोग करून हा कोश तयार केला आहे.

८७ ... ...–रोम बादशहांचा वृत्तांत. मुंबई, अमेरिकन मिशन छापखाना, १८५१. पृष्ठें ४+२०५. ( ७″×४″ ) ९३३·१४/ रो.बा.वृ.

बाँबे ट्रॅक्ट अँड बुक सोसायटीनें हें पुस्तक प्रसिद्ध केले. ज्युलियस सीझरपासून त्रेजनपर्यंत १४ बादशहांच्या गोष्टी या पुस्तकांत आहेत. प्रत्येक बादशहाचें चित्र दिलें आहे.

८८ **छत्रे, सदाशिव काशीनाथ** ( भाषांतरकार )–इसापनीतिकथा. नवी आवृत्ति. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, शिळाछाप, १८५१. पृष्ठें ४+६+६+३१०. (७·३″×५″) ८९१·४६३/छ स.का.

१८२८ सालीं या गोष्टी प्रथम प्रसिद्ध झाल्या. ही आवृत्ति मेजर कँडी यांनीं सुधारून वाढविलेली आहे. प्रत्येक कथेच्या प्रारंभीं चित्र आहे.

## १८५२

८९ ... ...—मराठी ज्ञानप्रसारक (मासिक). वर्ष ३ रें, अंक १ ते १२. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८५२. ( ८·२″×५·३″ ) ०५९·१४६/ म. ज्ञा. प्र.

९० ... ...–ज्ञानबोधक. पुस्तक २ रें. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८५२. पृष्ठें १०+१३८· (७·३″×४·२″) ४९१·४६८६/ ज्ञा. बो.

‘ स्टुडंटस् लिटररी अँड सायंटिफिक सोसायटी, मुंबई ’ या संस्थेनें मुलांस बोध करण्यासाठीं पांच पुस्तकें तयार केलीं त्यांतील हें दुसरें पुस्तक होय. यांत आईबापांचे उपकार, पोपट, स्वच्छता इत्यादि विषयांवर निबंध, कांहीं गोष्टी चित्रांसह दिल्या आहेत.

९१ ... ...–ज्ञानोदय ( पाक्षिक ). पुस्तक ११, अंक १ ते २४. मुंबई, अमेरिकन मिशन छापखाना, १८५२. पृष्ठें भिन्न. ( ८·९″×६″ ) ०५९·४६·/ ज्ञा.

ज्ञानोदय पाक्षिक खिस्ती धर्माचा प्रसार करण्यास व लोकांत राजनिष्ठा बाणविण्यास काढलें होतें , परंतु या कार्याबरोबरच ज्ञानप्रसार, सामाजिक व धार्मिक सुधारणा आणि करमणूक हीं कार्येंहि या पाक्षिकानें केलीं. याची वार्षिक वर्गणी पुढीलप्रमाणें होती. युरोपियनास ४ रु., हिंदी लोकांस

१॥ रु., आणि किरकोळ अंक ४ आणे. इंग्रजी मजकूर व त्याचें मराठी भाषांतर अशा क्रमानें हें छापलें जाई.

९२ **चिपळूणकर, कृष्णशास्त्री** (भाषांतरकार)–साक्रेटीस ह्याचें चरित्र. पुणें, ज्ञानप्रकाश छापखाना, शिळाछाप, १८५२. पृष्ठें ६+१३०. (७·५"×५·६") **९२१·९३३/ चि. कृ.**

जिनोफेन व प्लेटो यांनीं ग्रीकमध्यें साक्रेटिसाचें चरित्र लिहिलें. त्यावरून रोलिननें फ्रेंचमध्यें आणलें. त्याच्या इंग्रजी भाषांतराचें हें मराठी भाषांतर आहे.

९३ **फडके, गंगाधर आप्पाजीशास्त्री**–हिंदुधर्मतत्त्व. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, शिळाछाप, १८५२. पृष्ठें १७६. (६"×४") **२९४·२३/ फ. गं. आ.**

या लहानशा ग्रंथांत हिंदुधर्मतत्त्वज्ञान फार उत्कृष्ट रीतीनें सांगितलें आहे. वेदांतील तत्त्वज्ञानापासून रामानुज, मध्वाचार्यांच्या प्रतिपादनापर्यंत सर्वांचा परामर्ष घेतला आहे. हिंदूंच्या समाजरचनेचा इतिहासहि दिला आहे. या प्रतीला मुखपृष्ठ नाहीं.

९४ **भिडे, विष्णु मोरेश्वर** (भाषांतरकार)–खुसरू राजांचा इतिहास. पुणें ज्ञानप्रकाश छापखाना, शिळाछाप, १८५२. पृष्ठें ८+१८०. (७·१"× ५·५") **९२३·१५/ भि. वि. मो.**

इराणी बादशहा सायरस ऊर्फ खुसरू याचा इतिहास रोलिन या फ्रेंच इतिहासकारानें लिहिला होता त्यावरून केलेल्या इंग्रजी भाषांतराचें हें मराठी भाषांतर आहे.

९५ **मॅक्डोनाल्ड (कॅ.), अर्चिबाल्ड**–नाना फडणवीस यांची बखर. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८५२. पृष्ठें ६+२१५+१२. (७·"९×५") **९५४·०४०२/ मॅ. अ.**

खासगी दफ्तरें व प्रसिद्ध ग्रंथ यांचा उपयोग करून ही बखर लिहिली आहे.

९६ **मॅक्लेनॉन, जॉन** (भाषांतरकार)–रोगनिदान. मुंबई, बॅांबे एज्युकेशन

सोसायटीचा छापखाना, शिळाछाप, १८५२. पृष्ठें २३+१३७. ( ८″×६.३″ ) ६१६·०७/ मॅ. जॉ.

डॉ. गुड, कलन व आर्मस्ट्राँग यांच्या इंग्रजी ग्रंथांवरून हा ग्रंथ मराठींत लिहिला. प्रथम अनुक्रमणिका दिली आहे, परंतु वास्तविक ती विषयसूचि आहे. इंग्रजी व लॅटिन नामांची अशीच सूचि देऊन ग्रंथास आरंभ केला आहे. रोगांच्या ९ जातींचें क्रमवार विवेचन केलें आहे.

९७ **मॅक्लेनॅान, जॉन** (भाषांतरकार)–विषविद्या. मुंबई, बॉंबे एज्युकेशन सोसायटीचा छापखाना, शिळाछाप, १८५२. पृष्ठें ६+१४२.+३. ( ८″×६·४″ ) ६१५·९/ मॅ. जॉ.

विषांचे वेगवेगळे प्रकार देऊन त्यांवर उपाययोजना सांगितली आहे. देशी व पाश्चात्य औषधांचे गुणधर्म दिले आहेत.

९८ **मॅक्लेनॅान, जॉन** ( भाषांतरकार )–शारीर. मुंबई, बॉंबे एज्युकेशन सोसायटीचा छापखाना, शिळाछाप, १८५२. पृष्ठें १२+८+१४०+२०. ( १२·५″×७·७″ ) ६११·/मॅ.जॉ.

शारीरविज्ञान शास्त्रावरील इंग्रजी ग्रंथांवरून हें भाषांतर केलें आहे. स्पष्टीकरणासाठीं कांहीं आकृतीहि दिल्या आहेत.

९९ **शामराव मोरोजी**–काशी प्रकाश. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, शिळाछाप, १८५२. पृष्ठें ८+११३. (८″×५·१″) ९१५·४/शा. मो.

काशी, प्रयाग इत्यादि क्षेत्रांचीं तपशीलवार वर्णनें, मुंबईहून तिकडे जातांना वाटेंत लागणाऱ्या क्षेत्रांचीं वर्णनें, तसेंच दक्षिणेकडील क्षेत्रे व त्यांचीं मुंबईपासूनचीं अंतरें इत्यादि यात्रेकरूंना उपयुक्त अशी माहिती या ग्रंथांत दिली आहे.

## १८५३

१०० ... ...–गीतांचें पुस्तक. मुंबई, अमेरिकन मिशन छापखाना, १८५३ पृष्ठें २+१६०. ( ७·२″×४·″ ) २२३·२/गी.पु.

मुंबईच्या 'ऑक्झिलियरी बायबल सोसायटी' या ख्रिस्ती धर्मप्रसारक संस्थेनें हें पुस्तक तयार केलें. बायबलमधील ' बुक ऑफ साम्स'चें हें गद्य भाषांतर आहे.

१०१ ... ...–मराठी ज्ञानप्रसारक (मासिक). पुस्तक ४ थें, अंक १ ते १२. (८·२″×५·३″)                    ०५९· १४६/ म. ज्ञा. प्र.

१०२ ... ...–महंमदाचा वृत्तांत. मुंबई, अमेरिकन मिशन छापखाना, १८५३. पृष्ठें २+१६०. (७·१″×४·१″)                    ९२२·९७/म. वृ.

मुंबईच्या ट्रॅक्ट अँड बुक सोसायटीनें हें पुस्तक प्रसिद्ध केलें; यांत अरब लोकांची माहिती, महंमदाचें चरित्र, इस्लामी धर्मतत्त्वें, त्यांची ख्रिस्ती तत्त्वांशीं तुलना इत्यादि विषय आहेत.

१०३ **फडके, गोविंद नारायण** (भाषांतरकार)–यंत्रशास्त्राचीं मुळें. मुंबई, अमेरिकन मिशन छापखाना, १८५३. पृष्ठें ८+२१४+१. (७·२″× ४·२″)                    ५३१·/फ. गो. ना.

गतिशास्त्र व यंत्रशास्त्रावरील इंग्रजी ग्रंथाचें भाषांतर.

१०४ **मॅक्लेनॉन, जॉन** (भाषांतरकार)–आघातादिजन्य अस्थिविकार. मुंबई बॉंबे एज्युकेशन सोसायटीचा छापखाना, शिळाछाप, १८५३. पृष्ठें ६+१२६. (११·९″×७·६″)                    ६१७·१५/मॅ. जॉ.

अपघातांनीं हाडें व सांधे यांना जी इजा पोहोंचते त्यांचें आकृतींच्या साहाय्यानें स्पष्टीकरण करून तीवरचे उपचार दिले आहेत.

१०५ **महेश्वर** (भाषांतरकार)–गीतगोविंद. मुंबई, वि. स. अग्निहोत्री छापखाना, शिळाछाप, १८५३. पृष्ठें ४+१६३. (७·५″×५·७″)
८९१·४६१/ म.

जयदेव कवीच्या गीतगोविंदाचें 'हें प्राकृत भाषांतर विद्वज्जनांच्या साहाय्यानें केलें' असें म्हटलें आहे. जुन्या पद्धतीप्रमाणें गद्यांत सरळ भाषांतर केलें आहे.

१०६ **लेले, सदाशिव गणेशशास्त्री** (भाषांतरकार)–कपतान कुकसाहेब ह्याचा जलपर्यटनाचा वृत्तांत. पुणें, पुणें पाठशाळा छापखाना, शिळाछाप, १८५३. पृष्ठें ८+१६३. (७·४″×५·९″)
९१०·/ ले. स. ग.

रे. बिंगली यांच्या ग्रंथाचें रूपांतर आहे. 'दक्षिणा प्रैज' कमिटीनें हें पुस्तक पुरस्कारिलें आहे.

१०७ **सातारकर, गणपतराव**–हेमाद्रीकृत लेखनकल्पतरू. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८५३. पृष्ठें ८+१६०+८. ( ७·६"×४·७" )
६५१·७/ **सा. ग.**

हेमाद्रीचे लेखनकलाविषयक श्लोक देऊन पत्रव्यवहारांत योजण्याचे मायने व पत्रांचे नमुने दिले आहेत. कठिण शब्दांचे अर्थ शेवटीं दिले आहेत.

## १८५४

१०८ ... ...–चंद्रिका ( मासिक ). पुस्तक पहिलें, अंक मार्च ते डिसेंबर १८५४. मुंबई, सन्मार्गदर्शकमंडळी यांचा छापखाना. शिळाछाप, १८५४. पृष्ठें ३२४. ( ८"×५·४" ) ०५९·१४६/ **चं.**

१०९ ... ...–मराठी ज्ञानप्रसारक ( मासिक ). पुस्तक पांचवें अंक १ ते १२. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८५४.(८·२"×५·३")
०५९·१४६ म./ **ज्ञा. प्र.**

११० ... ...–ज्ञानदर्शन ( त्रैमासिक ). पुस्तक पहिलें, अंक पहिला, पु. २ रें, अंक २ ते ४, पु. ३ रें अंक १ ते ३. ( ७·६"×४·९" )
०५९·१४६/ **ज्ञा. द.**

१११ ... ...–ज्ञानोदय ( पाक्षिक ). पुस्तक १३ अंक, १ ते २४. मुंबई, अमेरिकन मिशनछापखाना, १८५४. पृष्ठें ३८६ ( अपूर्ण ). ( ९"×६" ) ०५९· १४६/**ज्ञा.**

११२ **गोडबोले, परशुरामपंत**–नवनीत. पुणें, पुणें पाठशाळा छापखाना, शिळाछाप, १८५४. पृष्ठें ८+४००. ( ८"×५·३" )
८९१·४६१/**गो. प.**

मुकुंदराजज्ञानेश्वरापासून मोरोपंतापर्यंत बहुतेक जुन्या मराठी कवींच्या काव्यांतील वेंचे संकलित केले आहेत. काव्यारंभीं कवींची उपलब्ध माहिती दिली आहे. कांहीं हिंदुस्थानी पदेंहि दिलीं आहेत.

११३ **जांभेकर, बाळशास्त्री**–हिंदुस्थानांतील इंग्लिशांच्या राज्याचा इतिहास. आवृत्ति दुसरी. मुंबई, अमेरिकन मिशन छापखाना, १८५४. पृष्ठें २+२६+२७६. ( ८·३"×५·२" ) ९५४·/ **जां. बा.**

१८४९ सालीं प्रसिद्ध झालेल्या आवृत्तींत फेरफार न करितां ही आवृत्ति छापिली आहे.

११४ **जोशी, रामचंद्र सदाशिव**–श्रीमद्भागवताची संक्षिप्त बखर. मुंबई, वि. स. अग्निहोत्री छापखाना, शिळाछाप, १८५४. पृष्ठें ३ ते ६+ ( स्कंधानुसार भिन्न–एकूण स्कंध १२ ). ( ९″×६·१″ )

**२९४·२७२/जो. रा. स.**

नारायणशास्त्री पुराणिकादि शास्त्र्यांच्या ४ वर्षांच्या सहकार्यानें हा ग्रंथ सिद्ध झाला. भागवताच्या १२ स्कंधांचा सारांश गद्यरूपानें दिला आहे. या प्रतींत सुरवातीचीं कांहीं पृष्ठें गहाळ आहेत.

११५ **जोशी, हरिश्चंद्र चंद्रोबा**–बुद्धिबळें खेळणाऱ्याचा मित्र. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८५४. पृष्ठें ८+१३+१२८+५. (८·६″×५·४″)

**७९४·१/जो. ह. चं.**

हॉवर्ड स्टॉटनच्या इंग्रजी ग्रंथावरून हा ' मित्र ' तयार केला आहे. निरनिराळ्या ' मात ' दाविणाऱ्या आकृती तीन रंगांत दाखविल्या आहेत.

११६ **पुराणिक, महादेवशास्त्री** ( भाषांतरकार )–भूगोल खगोल म्हणजे भूगोल आणि खगोल विद्येचीं मूलतत्त्वें. मुंबई, अमेरिकन मिशन छापखाना, १८५४. पृष्ठें १०+२६९. ( ७″×४″ ) **९१०·७/ पु. मा.**

सुलिव्हान यांच्या इंग्रजी ग्रंथाचें ( कांहीं भागाचें ) भाषांतर मेजर कँडी यांच्या तपासणीनंतर ग्रंथरूपांत छापलें आहे.

११७ **प्रभु, कृष्णराव माधवराव** ( भाषांतरकार )–हातिमताई चरित्र. भाग १ ते ६. मुंबई, र. त्रिं. जोशी व गणपत कृष्णाजी छापखाना, शिळाछाप, १८५४-५५ पृष्ठें २९४. ( ८·३″×५·८″ ) **८९१·४६३/ प्र. कृ. मा.**

मूळ फारशीवरून डंकन फारबस यानें इंग्रजी भाषांतर केलें त्याचें हें मराठी भाषांतर आहे. मूळ पुस्तकाचे ७ भाग आहेत; परंतु या प्रतींत ७ वा भाग नाहीं.

११८ **बर्जेस, इ.**–ग्रामर ऑफ दि मराठा लँग्वेज. मुंबई, अमेरिकन मिशन छापखाना, १८५४. पृष्ठें ८+१८२+१. ( ७·५″×५·१″ )

**४९१·४६५ / ब. इ.**

पुणें पाठशाळेंतील परशुरामपंत गोडबोले आदि विद्वान शास्त्र्यांच्या मदतीनें कॅरे, बालन्टाइन, केनेडी, दादोबा पांडुरंग यांच्या एतद्विषयक ग्रंथाच्या प्रकाशनानंतर त्यांचे प्रयत्न जमेस धरून हा ग्रंथ इंग्रजीमध्यें लिहिला आहे.

११९ **भाटवडेकर, कृष्णशास्त्री** (भाषांतरकार)–ळोखंडी रस्त्याचें संक्षिप्त वर्णन. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८५४. पृष्ठें ६+६२+३+१. (८·५″×५·३″) ६५६·/भा. कृ.

१८५३ सालीं हिंदुस्थानांत पहिल्यानें आगगाडी सुरू झाली. तीविषयीं माहिती लोकांना व्हावी म्हणून लार्डनर याच्या 'रेल्वे इकॉनमी' या ग्रंथातले कांहीं भाग भाषांतररूपानें प्रसिद्ध केले आहेत. शेवटीं जी. आय. पी. रेल्वेबाबत परिशिष्टें जोडलीं आहेत.

१२० **हरि केशवजी**–देशव्यवहारव्यवस्था या शास्त्राचीं मूलतत्त्वें. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८५४. पृष्ठें १८+२८०+५. (८·२″×५·३″) ३३०·/ह. के.

मिसेस मार्सेट व मि. मिल यांच्या अर्थशास्त्रावरील ग्रंथांवरून हा ग्रंथ प्रश्नोत्तररूपानें तयार केला गेला. पुणें पाठशाळेचे प्रो. हेनरी ग्रीन यांच्या सूचनांवरून हरि केशवजी यांनीं याच्या रचनेस सुरुवात केली. 'एलफिन्स्टन इन्स्टिटयुशनमधील पहिल्या प्रतीचे विद्यार्थी श्री. विश्वनाथ नारायण मंडलिक यांनीं हें काम पुरें केलें.'

## १८५५

१२१ ... ...–मराठी ज्ञानप्रसारक (मासिक). पुस्तक ६ वें, अंक १ ते १२. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८५५. (८·२″×५·३″) ०५९·१४६/म. ज्ञा. प्र.

१२२ ... ...–सद्धर्म-दीपिका (पाक्षिक) पुस्तक १ व २. मुंबई, बापू सदाशिव शेट यांचा छापखाना, शिळाछाप, १८५५. (७·७″×५·८″) ०५९·१४६/ स. दी.

पहिल्या पुस्तकांत १६ अंकांचीं २५६ पृष्ठें आहेत. दुसऱ्या अंकांत २० अंकांचीं ३२० पृष्ठें आहेत. ख्रिस्ती मतखंडनासाठीं हें मासिक चालविलें जाई. ज्ञानोदयाशीं याचा वाद नेहमी चाले.

१२३ ... ...–सुमित्र ( मासिक ). पुस्तक १ व २. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८५५. ( ६·५″×३·९″ ) ०५९·१४३/सु.

पुस्तक १ व २ पैकीं निरनिराळे आठ अंक एकत्र बांधले आहेत. हें मासिक स्त्रियांकरितां विशेषतः चालविलें जाई. प्रसार जास्त व्हावा व गरिबांसहि याचा लाभ व्हावा म्हणून याची किंमत फक्त १ आणा ठेविली होती.

१२४ **चिपळूणकर, कृष्णशास्त्री**–अर्थशास्त्रपरिभाषा प्रकरण पहिलें. पुणें, पुणें पाठशाळा छापखाना, शिळाछाप, १८५५. पृष्ठें १०+२९५. (८″×५·३″) ३३०·/चि. कृ.

मिलच्या इंग्रजी ग्रंथाधारें हा ग्रंथ तयार केला गेला. देशांतील संपत्तीचें स्वरूप, तिचें कार्य, सरकारशीं संबंध इत्यादि विषयांची चर्चा केली आहे. शास्त्रीय शब्दांना संस्कृत पारिभाषिक शब्द योजले आहेत.

१२५ **जांभेकर, बाळशास्त्री**–हिंदुस्थानचा इतिहास. आवृत्ति दुसरी, पुणें, पुणें पाठशाळा छापखाना, शिळाछाप, १८५५. पृष्ठें १२+२०५+८. ( ८·७″×६″ ) ९५४·/जां.बा.

या पुस्तकाची पहिली आवृत्ति १८४६ सालीं प्रसिद्ध झाली होती.

१२६ **भाटवडेकर, कृष्णशास्त्री**–त्र्यंबकी. मुंबई ज्ञानदर्पण छापखाना, शिळाछाप, १८५५. पृष्ठें ८+३८ ( अपूर्ण ). ( ७·३″×५·४″ ) ६१५·१६/ भा. कृ.

या नांवाचा श्लोकबद्ध ग्रंथ पूर्वी त्र्यंबक राजवैद्य यांनीं लिहिला होता त्याचें भाषांतर त्या श्लोकांसह या पुस्तकांत दिलें आहे.

१२७ **माधवराव मोरोजी** ( भाषांतरकार )–वाचण्याकरितां मराठी भाषेंत विद्योपक्रमाचा ग्रंथ. आवृत्ति दुसरी. मुंबई, वि. स. अग्निहोत्री छापखाना, शिळाछाप, १८५५. पृष्ठें १६+४+२+३७४. ( ८·५″×५·४″) ४९१·४६८६ /मा. मो.

श्री. नाना मोरोबा यांच्या साहाय्यानें पहिली आवृत्ति १८४८ सालीं प्रसिद्ध झाली होती. या आवृत्तीचें वेळीं माधवराव मोरोजी हयात नव्हते.

## १८५६

१२८ ... ...—ख्रिस्ती शास्त्र ईश्वरदत्त आहे याविषयीं इतिहासावरून घेतलेलीं प्रमाणें. मुंबई, अमेरिकन मिशन छापखाना, १८५६. पृष्ठें ४+८२. ( ७"×४·२" ) २३९·/ ख्रि. शा. प्र.

ख्रिस्ती शास्त्राचा खरेपणा व प्राचीनपणा सिद्ध करण्याचा प्रयत्न या पुस्तकांत केला आहे. बॉंबे ट्रॅक्ट अँड बुक सोसायटीच्या मराठी प्रकाशनावलींतील क्रमांक २२ चें हें पुस्तक आहे.

१२९ ... ...—गरीब लोकांस धर्म करण्याविषयीं बोध. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना. १८५६. पृष्ठें ४+३२. ( ६·५"×३·९" ) १७७.७/ ग. लो. ध.

मुंबईतील इस्रायल लोकांच्या परोपकारी मंडळीनें हा ग्रंथ प्रसिद्ध केला. दान करण्याची आवश्यकता, उद्देश व प्रकार देऊन हॉवर्ड, काब, जमशेटजी जीजीभाई इत्यादि दानशूर गृहस्थांचीं उदाहरणें दिलीं आहेत.

१३० ... ...—मतपरीक्षा. भाग १ व २. मुंबई, अमेरिकन मिशन छापखाना, १८५६ व १८५८. पृष्ठें २+७६+१३६. ( ७"×४·१" ) २०९·/ म. प.

बॉंबे ट्रॅक्ट अँड बुक सोसायटीनें मूळ संस्कृतवरून हे पुस्तक मराठींत आणविलें. हिंदुधर्मकल्पना खुळ्या असून ख्रिस्ती धर्मकल्पना सत्य आहेत असें दाखविण्याचा प्रयत्न या पुस्तकांत केला आहे. सोसायटीच्या मराठी ग्रंथावलींतील क्रमांक २० चें हें पुस्तक आहे.

१३१ ... ...—मराठी ज्ञानप्रसारक. ( मासिक ) पुस्तक ७ वें, अंक १ ते १२. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८५६. ( ८·२"×५·३" ) ०५९·१४१/म. ज्ञा. प्र.

१३२ ... ...—विदुरनीति. रत्नागिरी, जगन्मित्र छापखाना, शिळाछाप, १८५६. पृष्ठें ४+८६. ( ७·३"×५·८" ) १७०·८/वि. नी.

विदुरनीति व यक्षप्रश्नाचें भाषांतर.

१३३ **कोल्हटकर, महादेव गोविंदशास्त्री** ( भाषांतरकार )—कोलंबसाचा

वृत्तांत. आवृत्ति दुसरी. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८५६. पृष्ठें २+१७८. (८·४"×५·५") **९२३·९/को. म.गो.**

रॉबर्टसनकृत ' हिस्टरी ऑफ अमेरिका बुक सेकंड'चें भाषांतर.

१३४ **गिबसन, अलेक्झांडर**–शेतकी आणि घरगुती व्यवस्था यांविषयीं एतद्देशीय लोकांस उपदेश. आवृत्ति चौथी. पुणें, पुणें पाठशाळेचा छापखाना, शिळाछाप, १८५६. पृष्ठें १३०. (५·३"×४") **६३०·/गि.अ.**

शेतकीविषयक पाश्चात्य कल्पना या पुस्तकांत मांडल्या आहेत. ग्रामसुधारणेबाबत कांहीं सूचना केल्या आहेत.

१३५ **चौगुले, रामजी गणोजी**–रसायनशास्त्र अथवा हुन्नरनिधि. भाग पहिला. मुंबई, चौगुले छापखाना, शिळाछाप, १८५६. पृष्ठें ४+१२+८+५२+५५५. (८·७"×६") **५४०·/चौ. रा. ग.**

अष्टधातु व पारा यांचें वर्णन व त्यांपासून होणाऱ्या पदार्थांच्या कृति यांची माहिती या ग्रंथांत दिली आहे.

१३६ **दीक्षित, सखाराम रामचंद्र** ( भाषांतरकार )–शास्त्रीय ज्ञानदर्शन. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८५६. पृष्ठें २+२०+२६८+३. (८·५"×५·४") **५००·/दि. स.रा.**

डॉ. ब्रुअर यांच्या ' गाईड टु धि सायंटिफिक नॉलेज ' या ग्रंथाचें हें भाषांतर विष्णु अमृतराव यांच्या साहाय्यानें प्रसिद्ध झालें आहे. हें भाषांतर हरि केशवजी व कृष्णशास्त्री भाटवडेकर यांनीं तपासलें होतें. पदार्थविज्ञानशास्त्राचे प्राथमिक सिद्धांत प्रश्नोत्तररूपानें २९ प्रकरणांत मांडले आहेत. पारिभाषिक शब्दांचें परिशिष्ट शेवटीं जोडलें आहे.

१३७ **माडगांवकर, गोविंद नारायण**–उद्भिजजन्य पदार्थ. मुंबई, थॉमस ग्रेहाम छापखाना, १८५६. पृष्ठें ४+३२+२१६. ( ७·१"×४" ) **५८०·/ मा. गो. ना.**

धान्य, दाणा, कंद, भाजी इत्यादि मनुष्याच्या अन्नसामुग्रीचें वर्णन.

१३८ **माडगांवकर, गोविंद नारायण**–सत्यनिरूपण. आवृत्ति दुसरी. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८५६. पृष्ठें ६+८९. ( ७·१"×४" ) **१७७·३/ मा. गो. ना.**

या ग्रंथांस ' विलोबी प्राईझ ' मिळालें होतें. यांत एकूण ९ प्रकरणांत सत्याचरणाची महती अनेक उदाहरणें देऊन गायिली आहे.

## १८५७

१३९ ... ...—इंग्लंड देशाची बखर. भाग पहिला, आवृत्ति तिसरी. मुंबई, टॉमस ग्रेहाम छापखाना, १८५७. पृष्ठें ४+२४३+१. ( ६·७″×४″ ) ९४२·/ इं. ब.

१८३२ सालीं प्रसिद्ध झालेल्या १ ल्या आवृत्तीची ही तिसरी आवृत्ति. या प्रतींत मुखपृष्ठ गहाळ आहे.

१४० ... ...—इंग्लंड देशाची बखर–भाग दुसरा, आवृत्ति तिसरी. मुंबई, टॉमस ग्रेहाम छापखाना, १८५७. पृष्ठें ६+१८४+१८९+२. ( ७·२″×४·२″ ) ९४२· इं. ब.

१८३४ सालीं प्रसिद्ध झालेल्या दुसऱ्या भागाची ही तिसरी आवृत्ति आहे. या प्रतींत शेवटचीं दोन पृष्ठें गहाळ आहेत.

१४१ ... ...—नलाख्यानाची बखर. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, शिळाछाप, १८५७. पृष्ठें ३१×२. ( ६·४″×३·८″) २९४·/ न. ब.

ही बखर मोडी लिपींत आहे. रामचंद्रशास्त्री नांवाच्या गृहस्थानें " माधवरावसाहेब पंतप्रधान " यांना ही पत्ररूपानें सांगितल्याचे सुरवातीच्या उल्लेखावरून वाटतें.

१४२ ... ...–मराठी ज्ञानप्रसारक ( मासिक ) पुस्तक आठवें, अंक १ ते १२. गणपत कृष्णाजी छापखाना, १८५७. ( ८·२″×५·३″ ) ०५९·१४६/म. ज्ञा. प्र.

१४३ **केपन, ( कॅपटन ), डी** ( भाषांतरकार )–मराठ्यांची बखर. उत्तरार्ध, आवृत्ति चौथी. मुंबई, टॉमस ग्रेहाम छापखाना, १८५७. पृष्ठें १९+ ३३८+१. ( ७·″×४·१″ ) ९५४·०४/के. डी.

मूळ पुस्तक १८३० सालीं प्रसिद्ध झालें. दुसऱ्या आवृत्तींत पुस्तकाचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग पाडण्यांत आले. उत्तरार्धाची ही चौथी आवृत्ति आहे.

१४४ **केशव सखारामशास्त्री** ( भाषांतरकार )–हिंदुस्थानांतील ब्रिटिश लोकांचें राज्य व पूर्वीचीं राज्यें यांची तुलना आणि उद्भवलेल्या बंडापासून होणारे तोटे. मुंबई, टॉमस ग्रेहाम छापखाना, १८५७. पृष्ठें २+८+५०. ( ७·५"×५" ) **३२९·९५४/के. स.**

मुसलमान व मराठी अमदानींत लोकांना जीं दुःखें भोगावीं लागत असत, तीं जर परत भोगावीं लागूं नयेत असें वाटत असेल तर प्रजेनें बंडवाल्यांचा धिक्कार करून इंग्रज सरकारला पाठिंबा द्यावा असें प्रतिपादन केलें आहे. डोसाभाई फ्रामजी यांच्या गुजराती प्रबंधाचें हें भाषांतर आहे.

१४५ **गाडगीळ, हरि रघुनाथ**–जगाचा संक्षिप्त इतिहास. भाग दुसरा. मुंबई, टॉमस ग्रेहाम छापखाना, १८५७. पृष्ठें ६+१४२. ( ६·८"×३·९" ) **९०९·/गा. ह. र.**

जॉन सी मार्शमन यांच्या इंग्रजी ग्रंथावरून, रोम शहराच्या स्थापनेपासून येशु ख्रिस्ताच्या जन्मापर्यंतचा इतिहास या पुस्तकांत वर्णिला आहे.

१४६ **गोडबोले, परशुरामपंत** ( भाषांतरकार )–वेणीसंहार. पुणें, नारो रामचंद्र ठकार छापखाना, शिळाछाप, १८५७. पृष्ठें ८+८+२६८. ( ७·८"×५" ) **८९१·४६२/गो. प.**

मूळ संस्कृत नाटकाचें भाषांतर.

१४७ **छत्रे, केरो लक्ष्मण**–पदार्थविज्ञानशास्त्र. आवृत्ति दुसरी. पुणें, नारो रामचंद्र ठकार छापखाना, शिळाछाप. १८५७ पृष्ठें. १४+२०७. ( ९"×५·६" ) **५३०·/छ. के. ल.**

या पुस्तकाचें नांव पदार्थविज्ञानशास्त्र असलें तरी यांत स्वरशास्त्र, ज्योतिषशास्त्र, दर्शनानुशासन, वातावरण, रसायन इत्यादि शास्त्रांतील माहितीही दिली आहे. शास्त्रीय ज्ञानसंपादनाची आवड लोकांत उत्पन्न व्हावी म्हणून हा ग्रंथ केल्याचा उल्लेख प्रस्तावनेंत आहे.

१४८ **तर्खडकर, दादोबा पांडुरंग**–महाराष्ट्र भाषेचें व्याकरण. आवृत्ति तिसरी. मुंबई, टॉमस ग्रेहाम छापखाना, १८५७. पृष्ठें १०+१३+३५२+४. ( ७·१"×४·३" ) **४९१·४६५/ त. दा. पां.**

या पुस्तकाची १ ली आवृत्ति १८३६ मध्यें व दुसरी १८५० मध्यें प्रसिद्ध झाली. या प्रतींत सुरवातीचीं कांहीं पृष्ठें गहाळ आहेत.

१४९ **थेऊरकर, भाऊशास्त्री** (भाषांतरकार)–वाय्यावरण आणि त्यांतील चमत्कार. मुंबई, टॉमस ग्रेहाम छापखाना, १८५७. पृष्ठें २+१४२. (७″×४·१″) **५५१५·/ थे. भा.**

टॉमस डिकच्या ग्रंथावरून हें पुस्तक तयार केलें आहे. नानाशास्त्री आपटे यांनीं हें तपासलें आहे. वाय्यावरण (वातावरण) व त्यापासून भासमान होणारे चमत्कार, यांचें वर्णन कांहीं आकृतींच्या साहाय्यानें केलें आहे.

१५० **प्रभु देसाई, गोविंद गोपाळ** (भाषांतरकार)–भूगोलविद्या. रत्नागिरी, जगन्मित्र छापखाना, शिळाछाप, १८५७. पृष्ठें ४+१४+२०४. (७″×५·३″) **९१०·/प्र. गो. गो.**

रीड यांच्या भूगोलविषयक इंग्रजी ग्रंथाचें भाषांतर गोविंद रावजी गोडबोले व कृष्णाजी बल्लाळ फाटक यांच्या सहाय्यानें तयार केलें. मुखपृष्ठाच्या आधींचीं दोन पृष्ठें गहाळ झालीं आहेत.

१५१ **बाबा पदमनजी**–यमुनापर्यटन अथवा हिंदुस्थानांतील विधवांच्या स्थितीचें निरूपण. मुंबई, टॉमस ग्रेहाम छापखाना, १८५७. पृष्ठें १२+२७+१८+१६८+२+४. (६·८″×४″) **८९१·४६३/ बा. प.**

ग्रंथारंभीं 'विधवाश्रुमार्जन' नांवाचा दादोबा पांडुरंग यांचा संस्कृत प्रबध व त्याचा मराठी तर्जुमा दिला आहे.

१५२ **मंडलिक, विश्वनाथ नारायण**–सवयी आणि अभ्यास. मुंबई, टॉमस ग्रेहाम छापखाना, १८५७. पृष्ठें ८+७१. (७·२″×४·२″) **३७१·८/ मं. वि. ना.**

प्रस्तुत लेखकानें 'स्वकल्याणाचा उपाय' नांवाच्या स्वतःच्याच ग्रंथांतील कांहीं विवेचन निबंधरूपानें ज्ञानप्रसारक सभेपुढें मांडलें व तेंच येथें ग्रंथरूपानें प्रसिद्ध केलें. डॉ. टाडच्या 'विद्यार्थी मार्गदर्शक' या पुस्तकाच्या साहाय्यानें हें पुस्तक लिहिलें गेलें.

१५३ **महाले, वासुदेव कृष्ण**–रोम शहराचा संक्षिप्त इतिहास. मुंबई, टामस

ग्रेहाम छापखाना, १८५७. पृष्ठें ८+१०७. ( १०७·१″×४·१″ )
**९४५·/ म. वा. क्र.**

मूळ इंग्रजीवरून ( आउट लाईन्स ऑफ रोमन हिस्टरी फॉर फॅमिलीज अँड स्कूल्स ) हें पुस्तक तयार केलें गेलें. श्री. गोविंद नारायण माडगांवकर यांनीं हें पुस्तक शुद्ध केलें.

१५४ **मोल्सवर्थ, जे. टी.**–ए डिक्शनरी मराठी अँड इंग्लिश. आवृत्ति दुसरी. मुंबई, बॉंबे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीचा छापखाना. १८५७. पृष्ठें ३०+९२०+१. ( ११·७″×९·२″ ) **४९१·४६३२/ मो. ज. टी.**

हा कोश जॉर्ज व थॉमस कँडी यांच्या साह्याय्यानें प्रसिद्ध झाला. डॉ. विल्सन यांचा मराठी भाषेवरील प्रबंध प्रारंभीं जोडला आहे.

१५५ **विश्वनाथ कृष्णनाथ**–कोलापूर प्रांताचें वर्णन आणि राजांचा इतिहास. कोल्हापूर, ज्ञानप्रसारक छापखाना, शिळाछाप, १८५७. पृष्ठें ४+५६ ( अपूर्ण ). ( ६″×४·२″ ) **९१५·४०/ वि. कृ.**

ग्रँट डफ, मेजर ग्रेहाम यांच्या ग्रंथांच्या आधारानें प्रश्नोत्तररूपानें हा इतिहास लिहिला आहे.

१५६ **क्षत्री, काशीनाथ गंगाधर**–मुलींकरितां कण्यांचें किंवा रांगोळीचें पुस्तक. भाग पहिला. १८५७. पृष्ठें ६+४+१८ (आकृति) ( ९·६″×७·४″ )
**७४०·/ क्ष. का. गं.**

## १८५८

१५७ ... ...—मराठी संसारचोपडी. मुंबई, ज्ञानदर्पण छापखाना, शिळाछाप, १८५८. पृष्ठें ४+१४२. (८·८″×५·८″)
**४९१·४६८६/ म. सं. चो.**

बाराखड्या, पाढे, बोधवचनें, पत्रांचे मायने, कोष्टकें, करारपत्रांचे नमुने, डाकेचे नियम इत्यादि विद्यार्थ्यांना उपयुक्त माहिती दिली आहे.

१५८ ... ...—लघुव्याकरण. रत्नागिरी, जगन्मित्र छापखाना, शिळाछाप, १८५८. पृष्ठें २+७०. ( ६″×४·५″) **४९१·४६५/ ल. व्या.**

'सरळ रेघ आणि गोलीय त्रिकोणमितीच्या कर्त्यानें केलें' असा लेखकासंबंधीं उल्लेख आहे.

१५९ ... ...—सिंहासनबत्तिशी. मुंबई, बापु सदाशिव हेंगिष्टे छापखाना, शिळाछाप, १८५८. पृष्ठें २+११८. ( ५·९″×४·४″ )

८९१·४६३/ सिं. ब.

१६० **माडगांवकर, गोविंद नारायण**–लोखंडी रस्त्याचे चमत्कार. मुंबई, टॉमस ग्रेहाम छापखाना, १८५८. पृष्ठें ३१. ( ६·८″×४″ )

६५६·/ मा. गो. ना.

मानवाने केलेल्या शास्त्रीय ज्ञानांतील प्रगतीचा आढावा घेऊन बाष्पशक्तीच्या शोधाचें महत्त्व व विशेषतः रेल्वेच्या शोधाचें महत्त्व वर्णन केलें आहे. १६ एप्रिल १८५३ रोजीं बोरीबंदर ते ठाणा येथपर्यंत पहिल्यानेच आगगाडी सुरू झाली. त्या प्रसंगाचेंहि मनोरंजक वर्णन या पुस्तकांत आलें आहे.

१६१ **राजपूरकर, योसेफ येहेजकेल**–प्रायश्चित्ताच्या दिवशीं पापाविषयीं कबूल होणें. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८५८. पृष्ठें ६+२९. ( ६·९″×४·२″ )

२३४·५/ रा. यो. ये.

इस्राएलांच्या धर्मशास्त्रांत एतद्विषयक ज्या प्रार्थना आहेत, त्यांचा सारांश या पुस्तकांत दिला आहे.

१६२ **सदाशिव विश्वनाथ**–सर्व देशांतील निवडक म्हणी. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८५८. पृष्ठें १४+४६५+१८. ( ७·१″×४·७″ )

३९८·९/स. वि.

सर्व देशांतील ४३३७ म्हणींचा संग्रह. इंग्रजी म्हण नंतर शेजारच्या पृष्ठावर तिचें मराठी भाषांतर किंवा समानार्थक म्हण अशा क्रमानें पुस्तक लिहिलें आहे. प्रस्तावनेंत म्हणींचें महत्त्व दिलें आहे. या प्रतींत मुखपृष्ठ गहाळ आहे.

## १८५९

१६३ ... ...–धि विक्टोरिया म्युझियम अँड गार्डन्स ( विक्टोरिया सर्व पदार्थोपवनालय ). मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८५९. पृष्ठें ४+५५+४. ( ८·१″×५·१″ )

०६९·/वि. गा.

मुंबईतील हिंदी व युरोपियन रहिवाशांची सभा दि. १५ डिसेंबर १८५८ रोजीं, श्री. जगन्नाथ शंकरशेट यांच्या अध्यक्षतेखालीं भरून हें

पदार्थसंग्रहालय स्थापण्याचें ठरलें. देणगीदारांच्या यादींत युरोपियन देणगीदाराचें मात्र नांव नाहीं.

१६४ ... ...-प्रभोदय ( मासिक ). पुस्तकें ४ ते ७ एकूण १७ अंक. मुंबई, टॉमस ग्रेहाम छापखाना, १८५९. भिन्न पृष्ठसंख्या. ( ७·८″× ५·१″ ) **०५९·१४६/प्र.**

१६५ ... ...-फुलमुनी आणि करुणा. मुंबई, टॉमस ग्रेहाम छापखाना, १८५९. पृष्ठें ४+१७५. ( ७·१″×४·२″ ) **८९१·४६३/ फु. क.**

मिसेस मुलेन्स या मिशनरी स्त्रीनें ख्रिस्तीधर्मप्रचारासाठीं लिहिलेल्या कथेचें भाषांतर. बॉंबे ट्रॅक्ट ॲंड बुक सोसायटीतर्फे हें पुस्तक प्रसिद्ध झालें.

१६६ ... ...-मराठी ज्ञानप्रसारक (मासिक). पुस्तक दहावें, अंक १ ते १२. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना. १८५९. ( ८·२″×५·३″ )
**०५९·१४६/म. ज्ञा. प्र.**

१६७ **गोडबोले, परशुरामपंत** ( भाषांतरकार )-उत्तररामचरित्र नाटक. मुंबई, एल. एम. डिसोझा छापखाना, १८५९. पृष्ठें ६+१६४. ( ७·६″×५″ ) **८९१·४६२/ गो. प.**

भवभूतीच्या मूळ संस्कृत नाटकाचें भाषांतर.

१६८ **चिपळूणकर, कृष्णशास्त्री**-संस्कृत भाषेचें लहान व्याकरणाचें पुस्तक. मुंबई, बॉंबे एज्युकेशन सोसायटीचा छापखाना, १८५९. पृष्ठें ६+५६. ( ८″×४·७″ ) **४९१·१५/ चि. कृ.**

१६९ **चौगुले, रामजी गणोजी**-रसायनशास्त्र अथवा हुन्नरनिधि. भाग दुसरा. मुंबई, रा. ग. चौगुले छापखाना, शिळाछाप, १८५९ पृष्ठें ३६+७०८ ( ८·८″×५·६″ ) **५४०·/ चौ. रा. ग.**

'माती, दगड, रत्नें, आम्लें' इत्यादिपासून जे विविध उपयोगी पदार्थ तयार करितात त्यांची माहिती व कृति या पुस्तकांत दिली आहे. या प्रतींत मुखपृष्ठ गहाळ आहे.

१७० **छत्रे, सदाशिव काशीनाथ** ( भाषांतरकार )-इसापनीतिकथा. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८५९. पृष्ठें २+८+९४ ( अपूर्ण ). ( ६·३″×४·३″ ) **८९१ ४/ छ. स. का.**

छत्रे यांच्या भाषांतराची चौथी (?–तिसरी) आवृत्ति मे. कँडी यांनीं शोधिली. त्यांतील निवडक कथांचा हा संग्रह आहे.

१७१ **टिळक, गंगाधर रामचंद्र**–लघुव्याकरण. रत्नागिरी, जगन्मित्र छापखाना, शिळाछाप, १८५९. पृष्ठें २+७८. ( ५·९″×४·५″ )

**४९१·६५/ टि. गं. रा.**

गंगाधरशास्त्री फडके, दादोबा पांडुरंग यांचीं व्याकरणावरील पुस्तकें लहान मुलांना समजण्यास कठिण पडतात म्हणून हें पुस्तक त्यांना समजेल अशा सोप्या भाषेंत लिहिलें आहे असें प्रस्तावनेत म्हटले आहे.

१७२ **पाळंदे, शिवरामशास्त्री** ( भाषांतरकार )–प्रसन्न राघव नाटक. मुंबई. गणपत कृष्णाजी छापखाना, १८५९. पृष्ठें ६+१६२. (७·६″×४·६″)

**८९१·४६२/ पा. शि.**

जयदेव कवीच्या मूळ संस्कृत नाटकाचें हें भाषांतर आहे.

१७३ **भाटवडेकर, कृष्णशास्त्री**–वर्तमानवाहक विद्युद्यंत्र याचें संक्षिप्त वर्णन. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८५९. पृष्ठें ६+६६. ( ८·२″× ५·५″ )

**६५४·/भा. कृ.**

"दक्षणी भाषेंत पुस्तकें प्रसिद्ध करणाऱ्या मंडळीसाठीं" हें पुस्तक इंग्रजी पुस्तकावरून लिहिलें गेलें. एतत्संबंधीं कायदे व दर यांचीहि माहिती दिली आहे.

१७४ **विश्वनाथ जगन्नाथजी** ( भाषांतरकार )–चवथ्या पुस्तकाचें महाराष्ट्र भाषांतर, मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८५९. पृष्ठें १२+२२८. ( ७·४″×४·२″ )

**४९१·४६८६/वि. ज.**

'आयरिश सिरीज'पैकीं चौथ्या क्रमिक पुस्तकाचें भाषांतर.

१७५ **क्षत्री, काशिनाथ गंगाधर**–कितानावरील लोकरी कशिदा पाडण्याची रीति. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८५९. पृष्ठें ३५. ( ५·२″× ४·२″ )

**६४६·२/क्ष. का. गं.**

मिस लँबर्ट व मिसेस पुलन यांच्या इंग्रजी ग्रंथाधारें हें पुस्तक प्रश्नोत्तर-रूपानें लिहिलें आहे. कशियाच्या कांहीं आकृती दिल्या आहेत. मुखपृष्ठ गहाळ झालें आहे.

## १८६०

१७६ ... ...–मराठी ज्ञानप्रसारक ( मासिक ). पुस्तक अकरावें, अंक १ ते १२. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८६०. ( ८·२″×५·३″ )
०५९·१४६/म.ज्ञा. म.

१७७ ... ...–विचारदर्पण ( मासिक ). पुस्तक पहिलें, अंक १ ते १२. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८६०. पृष्ठें ९६. ( ८·४″×६″ )
०५९·१४६/वि. द.

क्षत्रिय ज्ञातीच्या उन्नतीकरितां हें मासिक चालविलें जात असे. यांत मुख्यतः धार्मिक आचारांचा ऊहापोह होत असे. शेवटच्या दोन अंकांत क्षत्रिय ज्ञातिसभा या संस्थेचे कायदे दिले आहेत.

१७८ **अमृतराय**–शुकचरित्र. मुंबई, माधवराव चंद्रोबा छापखाना. शिळाछाप, १८६०. पृष्ठें ४०. ( ६·४″×४·७″ ) ८९१·४६१८९/ अ.

१७९ **अष्टपुत्रे, भावाचार्य**–भावदीपिका. पुणें, बा. रा. ठकार छापखाना, शिळाछाप, १८६०. पृष्ठें ४+७७+४ ( चित्रें ). ( ८·९″×६″ )
८९१·४६१ /अ. भा.

गीतगोविंदाची समश्लोकी प्राकृत टीका जयदेवाच्या आख्यायिकेसह दिली आहे.

१८० **ओक, नरसिंह विनायकशास्त्री** ( भाषांतरकार )–हिंदुस्थानचा इतिहास. भाग दुसरा. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८६०. पृष्ठें ७+२३६. ( ७·१″×४·१″ ) ९५४·/ ओ. न. वि.

मि. मरे याच्या मूळ इंग्रजी ग्रंथावरून हा इतिहास लिहिला गेला. मूळ ग्रंथांतील प्रकरणें ६ ते ९ वेगळीं काढून हा दुसरा भाग तयार केला आहे. यांत मुख्यत : मुसलमानी अमलाचें वर्णन आलें आहे.

१८१ **कँडी, टी** ( मेजर )–हिंदुस्थानचें वर्णन. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८६०. पृष्ठें ६+१२८. ( ७·९″×४·८″ ) ९१५·४/ कँ. टी.

' आशियाचा भूगोल ' या नांवाचा ग्रंथ कँडी यांनीं लिहिला होता. त्यांतील हिंदुस्थानविषयक भाग वेगळा काढून व १८५७ नंतरच्या ऐतिहासिक घडामोडींच्या वर्णनाचा भाग जोडून हें पुस्तक तयार केलें.

१८२ **काशीनाथ गंगाधर**–विवाहप्रकरणी संवाद. १८६०. पृष्ठें ६३. ( ५·९″×४·१″ ) **३९२·५/ का. गं.**

लग्नविधीमध्यें शास्त्रास सोडून विधि कांहीं पुरोहित करतात त्याचा विचार करण्यासाठीं हें पुस्तक लिहिलें गेलें. या प्रतींत मुखपृष्ठ गहाळ आहे.

१८३ **कृष्णनाथ रघुनाथजी** ( भाषांतरकार )–मराठी शाळा आणि पंतोजी. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८६०. पृष्ठें १४+३१. ( ७·६″×४·१″ ) **३७१·/ कृ. र.**

‘ बॉंबे क्वार्टरली रिव्ह्यू ’मध्यें प्रसिद्ध झालेल्या लेखाचें भाषांतर.

१८४ **गुर्जर, कृष्णशास्त्री** ( संपादक )–मयुरकृत मंत्ररामायण. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, शिळाछाप, १८६०. पृष्ठें २+(७५×२) (९·६″× ६·३″) **८९१·४६१/गु. कृ.**

हें मंत्ररामायण लेखकांस उपलब्ध झालेल्या तीन हस्तलिखित प्रतींवरून तयार केलें आहे. कठिण शब्दांचे अर्थ तळटीपांत दिले आहेत.

१८५ **छत्रे, केरो लक्ष्मण**–अंकगणित, मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८६०. पृष्ठें ६+११४· ( ६″×४·२″ ) **५११·/छ.के.ल.**

प्राथमिक शाळांतील विद्यार्थ्यांकरितां तयार केलेलें पुस्तक.

१८६ **छत्रे, केरो लक्ष्मण**–ग्रहसाधनाचीं कोष्टकें. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८६०. पृष्ठें १०+९+३३१+१. ( ८·५″×५·२″ ) **५२०·/ छ. के. ल.**

हीं कोष्टकें युरोपखंडांतील गणकाचे ग्रंथ व प्रत्यक्ष घेतलेले वेध यांच्या आधारानें तयार केलीं आहेत. खगोलशास्त्रांतील प्रगतीची कल्पना आणून देण्याच्या हेतूनें हें पुस्तक लिहिलें आहे.

१८७ **जनार्दन रामचंद्रजी**–कविचरित्र. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८६०. पृष्ठें १६+२४५+१५. ( ८·१″×५″ ) **९२८·९१४/ ज. रा.**

सन १८४७ सालीं श्री. कावेली वेंकटरामशास्त्री यांनीं संस्कृत, तामिळ, तेलगू व प्राकृत कवींच्या चरित्राचें पुस्तक लिहिलें होतें. त्या व भक्तिविजय, संतलीलामृत, नवनीत इत्यादि ग्रंथांच्या साहाय्यानें या चार भाषांतील निवडक अशा एकूण १७२ कवींचीं चरित्रें व काव्यविषयक माहिती दिली आहे.

१८८ **दामोदर**–श्रीकृष्णलीला आख्यान. मुंबई, ज्ञानबोधक छापखाना, शिळाछाप, १८६०. पृष्ठें ८+५+१७१. ( ६·७″×४·६″ ) **८९१·४६२/दा.**

या आख्यानाचें स्वरूप नाटकासारखें आहे. प्रत्येक पात्राचीं पद्यें व त्यांचा सारांश व कांहीं संवाद असें याचें स्वरूप आहे. वीरेश्वर सदाशिव छत्रे यांनीं हें आख्यान शुद्ध केलें.

१८९ **दामोदर कवि**–हरिश्चंद्र आख्यान. मुंबई, ज्ञानबोधक छापखाना, शिळाछाप, १८६०. पृष्ठें ५+११७ (अपूर्ण). ( ६·७″×४·६″ ) **८९१·४६२/दा. क.**

१९० **पर्वते, रघुनाथशास्त्री**–भाषाविवृतिसहित गीता. पुणें, बा. रा. ठकार छापखाना, शिळाछाप, १८६०. पृष्ठें २७६+२. ( ११·५″×७·५″ ) **१८१·४५६/प.र.**

गीतेचा प्रत्येक श्लोक विस्तृत विवेचनासह दिला आहे. पुस्तक पोथीप्रमाण छापिलें आहे.

१९१ **महादेव गोविंदशास्त्री** ( भाषांतरकार )–प्राकृत कवितेचें पहिलें पुस्तक. पुणें, ज्ञानप्रकाश छापखाना, शिळाछाप. १८६०. पृष्ठें ८+१०२+४. ( ५·३″×४·१″ ) **८९१·४६१/म. गो.**

इंग्रजी क्रमिक पहिल्या कवितेच्या पुस्तकांतील कवितांचें भाषांतर.

१९२ **मांडे, गोविंद रावजी** ( भाषांतरकार )–हिंदुस्थानची शकावलि म्हणजे हिंदु, मुसलमान, आरब, क्रिस्तियन आणि पार्शी लोकांत जे शक चालू आहेत, त्यांचा संग्रह. मुंबई, ज्ञानसागर छापखाना, शिळाछाप, १८६०. पृष्ठें ८+२+८२. ( ११·८″×८·७″ ) **९५४·००९/मां.गो. रा.**

"हिंदुस्थानांत व एशिया खंडांतील इतर प्रदेशांत जीं महत्कृत्यें ज्या ज्या सालांत घडलीं, तीं त्या त्या सालांच्या समोर थोडक्यांत लिहिलीं आहेत." टॉमस मॅक्कडनच्या ग्रंथाचें भाषांतर.

१९३ **क्षत्री, दामोदर भाऊ**- मनोरंजक चमत्कारसंग्रह. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, शिळाछाप, १८६०. पृष्ठें ६२. ( ७·१″×४·२″ ) **७९३·८/क्ष. दा. भा.**

रसायन आणि पदार्थविज्ञान शास्त्रांतील तत्त्वांवर आधारलेल्या व चमत्काराप्रमाणें भासणाऱ्या कृतींचें वर्णन या पुस्तकांत केलें आहे.

## १८६१

१९४ ... ...—पुणें पाठशाळापत्रक. पुस्तक पहिलें, अंक १ ते १२. पुणें, ना. रा. ठकार छापखाना, शिळाछाप, १८६१. पृष्ठें ३०६. ( ७·९"×५·५" ) ०५९·१४६/ पु. पा. प.

मे १८६१ ते एप्रिल १८६२ पर्यंतचे बारा अंक एकत्र आहेत. या मासिकांतील माहिती विद्यार्थी व शिक्षक यांच्या उपयोगाची असे. शिक्षणखात्याच्या गॅझेटासारखाहि त्याचा उपयोग होत होता.

१९५ ... ...—मराठी ज्ञानप्रसारक ( मासिक ). पुस्तक बारावें, अंक १ ते १२. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८६१. ( ८·२"×५·३" ) ०५९·१४६/ म. ज्ञा. म.

१९६ **आठल्ये, जनार्दन हरि**– बाळवैद्य. रत्नागिरी, जगन्मित्र छापखाना, शिळाछाप, १८६१. पृष्ठें ८+१२१. ( ७·४"×५·५" ) ६१८·६/ आ. ज. ह.

डोमेस्टिक गाइड टू मदर्स इन इंडिया या पुस्तकावरून हा ग्रंथ लिहिला आहे. लहान मुलांच्या रोगांवरील उपायांची माहिती यांत आहे.

१९७ **गोडबोले, परशुरामपंत** ( भाषांतरकार )–शाकुंतल नाटक. सप्तांकी. पुणें, ज्ञानप्रकाश छापखाना, शिळाछाप, १८६१. पृष्ठें ६+२६९. ( ८·८"×५·९" ) ८९१·४६२/ गो. प.

कालिदासाच्या शाकुंतलाचें भाषांतर.

१९८ **गोडबोले, परशुरामपंत** ( भाषांतरकार )–वेणीसंहार. आवृत्ति दुसरी. मुंबई, मुंबईसमाचार छापखाना, १८६१. पृष्ठें ११+१५६. ( ८·४"×५·३" ) ८९१·४६२/ गो. प.

याची पहिली आवृत्ति १८५७ सालीं प्रसिद्ध झाली होती.

१९९ **चिपळूणकर, कृष्णशास्त्री**–अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८६१. पृष्टें ८+३०२. ( ८·४"×५·७" ) ५००·/ चि. कृ.

एलिमेंटरी कोर्स ऑफ रीडिंग या इंग्रजी पुस्तकाच्या धर्तीवर याची रचना केली आहे. अनेक शास्त्रांच्या प्राथमिक तत्त्वाची ओळख करून देऊन

जिज्ञासा वाढविणें हा या मागील हेतु आहे, असें प्रस्तावनेंत म्हटलें आहे.

२०० **पंडित, विष्णु परशुरामशास्त्री** ( भाषांतरकार )–हिंदुस्थानचा इतिहास. भाग तिसरा. मुंबई, एक्स्चेंज छापखाना, १८६१. पृष्ठें ६+३१०. ( ८·४″×५·५″ ) **९५४·/पं. वि. प.**

मरेच्या हिस्टरी ऑफ ब्रिटिश इंडिया या पुस्तकांतील प्रकरणें १० ते १४ यांचें हें भाषांतर आहे. कर्नाटक, म्हैसूर, बंगाल व मराठी प्रदेशांच्या पाडावाचा इ. स. १८०५ पर्यंतचा इतिहास या पुस्तकांत आला आहे.

२०१ **भागवत, नारायण विनायक**–भूगोलविद्या. मुंबई, मुंबईसमाचार छापखाना, १८६१. पृष्ठें २+१४२. ( ७·५″×४·७″ )
**९१०·/भा. ना. वि.**

मि. मॉरिस यांच्या इंग्रजी ग्रंथाच्या आधारें भूगोलशास्त्राचीं तत्त्वें व देशांची त्रोटक माहिती या पुस्तकांत दिली आहे.

२०२ **भागवत, विसाजी भास्कर** ( प्रकाशक )–गीतार्थबोधिनी. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८६१. पृष्ठें अध्यायानुसार भिन्न. ( ९″×६·२″ )
**८९१·४६१/ भा. वि. भा.**

मूळ गीता, तीवरील वामनी समश्लोकी, मोरोपंती आर्या, तुलसीदासकृत दोहरे, मुक्तेश्वरी आर्या आणि तुकारामकृत अभंग अशा पांच प्रकारच्या टीका छापल्या आहेत. पुस्तक पोथीसारखें छापिलें आहे.

२०३ **भाटवडेकर, कृष्णशास्त्री** ( भाषांतरकार )–आकाशसौंदर्य. मुंबई, ज्ञानदर्पण छापखाना, शिळाछाप. १८६१. पृष्ठें ६+४+३+१३७+१०४ ( चित्रें ). ( ७·८″×५·५″ ) **५२३·/ भा. कृ.**

चार्लस एफ. ब्लंटच्या 'ब्यूटी ऑफ दि हेवन्स' या इंग्रजी पुस्तकाचें भाषांतर.

२०४ **महादेव, गोविंदशास्त्री** ( भाषांतरकार )–मराठी कवितेचें दुसरें पुस्तक. भाग तिसरा, मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना. १८६१. पृष्ठें ६३. ( ७·४″×४·३″ ) **८९१·४६१/ म. गो.**

शाळाखात्याच्या तिसऱ्या इंग्रजी पुस्तकाच्या दुसऱ्या भागांतील कवितांचें पद्यमय भाषांतर.

२०५ **मंडलिक, विश्वनाथ नारायण** ( भाषांतरकार )-हिंदुस्थानचा इतिहास, भाग पहिला ( हिंदु व मुसलमान राजांचें वर्णन ). मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८६१. पृष्ठें ६+१७+२०+५११. ( ८·२″×४·६″ ) **९५४·/ मं. वि. ना.**

एल्फिन्स्टनच्या इंग्रजी ग्रंथावरून हा ग्रंथ तयार केला आहे. अकबराच्या कारकीर्दीच्या अखेरपर्यंतचा इतिहास यांत आला आहे.

२०६ **मंडलिक, विश्वनाथ नारायण** ( भाषांतरकार )-हिंदुस्थानचा इतिहास. भाग दुसरा. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८६१. पृष्ठें ३१+५०४. ( ७·९″×४·२″ ) **९५४·/ मं. वि. ना.**

अकबरापासून मोगल सत्तेच्या अखेरपर्यंत ( १७६१ ) चा भाग यांत आला आहे.

## १८६२

२०७ **गोडबोले, कृष्णशास्त्री** ( भाषांतरकार )-ज्योतिःशास्त्र. मुंबई, बॉम्बे एज्युकेशन सोसायटीचा छापखाना, १८६२. पृष्ठें ८+१५४. ( ७·८″× ४·८″ ) **५२०·/ गो. कृ.**

विल्यम व रॉबर्ट चेंबर्स यांच्या ग्रंथाचें भाषांतर.

२०८ **जुन्नरकर, सीताराम रावजी**-परमधर्मतत्त्व. मुंबई, वि. स. अग्निहोत्री छापखाना, शिळाछाप, १८६२. पृष्ठें ८+३+११५ ( अपूर्ण ). ( ६·५″×४·७″ ) **२०१·/ जु. सी. रा.**

मद्यपान, मांसाशन व हिंसा यांचा व शाक्तपंथियांचा निषेध या पुस्तकांत केला आहे.

२०९ **थत्ते, चिंतामणशास्त्री**-विराटपर्वाची मराठी बखर. मुंबई, ज्ञानदर्पण छापखाना, शिळाछाप, १८६२. पृष्ठें ८+२५६. ( ९·३″×६·२″ ) **२९४·२१२/ थ. चिं.**

गजाननशास्त्री डोंगरे यांच्या साहाय्यानें मूळ महाभारतांतील विराटपर्वाचा कथाभाग येथे सांगितला आहे. ७ चित्रें आहेत.

२१० **दांत्ये, रघुनाथ विठ्ठल** ( भाषांतरकार )-मिताक्षरा व्यवहाराध्याय आणि व्यवहारमयूखदायभाग यांचें मराठी भाषांतर. आवृत्ति दुसरी, मुंबई,

गणपत कृष्णाजी छापखाना, १८६२. पृष्ठें ६+५६+४००, (प. भाग) +८३ ( दु. भाग )+२२. २९४·२४/ दां. र. वि.

संस्कृत धर्मशास्त्राचा परिचय करून देण्यासाठीं हें पुस्तक लिहिलें आहे. पारिभाषिक शब्दांचा कोश शेवटीं दिला आहे.

२११ **नामदेव**–तीर्थावळीचे अभंग. पुणें, वि. स. अग्निहोत्री छापखाना, शिळाछाप, १८६२. पृष्ठें २+४०. (९·३″×६·४″) ८९१·४६१/ ना.

एकूण ५७ अभंग ग्रथित केले आहेत.

२१२ **भागवत, विनायक नारायण** (भाषांतरकार )–दुर्दैवी मुराद व दैववान सलाउद्दीन. पुणें, ज्ञानप्रकाश छापखाना, १८६२. पृष्ठें ८+९४ ( ६·३″×३·९″ ) ८९१·४६३/ भा. वि. ना.

मूळ इंग्रजी पुस्तकाचें भाषांतर. कृष्णशास्त्री यांनीं शुद्ध केलेलें.

२१३ **भाटवडेकर, कृष्णशास्त्री** ( भाषांतरकार )–माधवनिदान. मुंबई, ज्ञानदर्पण छापखाना, शिळाछाप, १८६२. पृष्ठें १०+२०+४६०. ( ९·२″×६·१″ ) ६१६·०७/ भा. कृ.

याच नांवाच्या माधवाचार्यकृत मूळ संस्कृत ग्रंथाचें भाषांतर.

२१४ **मंडलिक, विश्वनाथ नारायण** ( भाषांतरकार )–हिंदुस्थानचा इतिहास उपोद्घात. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८६२. पृष्ठें ८+८+३९६ ( ८·१″×४·६″ ) ९५४·/ मं. वि. ना.

एल्फिन्स्टनच्या मूळ ग्रंथाचें भाषांतर. यांत हिंदूंच्या समाज, धर्म, शास्त्र, भाषा, शिल्प इत्यादि विषयांबद्दल माहिती दिली आहे.

२१५ **मोरोपंत**–वनपर्व. मुंबई, माधव चंद्रोबा छापखाना, शिळाछाप, १८६२. पृष्ठें २+२+१७३. ( ९·४″×६″ ) ८९१·४६१/ मो.

श्री. माधव चंद्रोबा हे सर्वसंग्रह नांवाचें नियतकालिकवजा पुस्तक मधून मधून प्रसिद्ध करीत. त्यांत बहुतेक जुन्या मराठी कवींची कविता छापलेली आहे. पोटभेद पाहण्याचें व कठिण शब्दांचे अर्थ तळटीपांत देण्याचें काम परशुरामपंत गोडबोले हे करीत असत.

## १८६३

२१६ ... ...—मराठी शालापत्रक ( मासिक ). पुस्तकें ३,४ व ५. पुणें,

ज्ञानप्रकाश छापखाना, पृष्ठें भिन्न. ( ६·७″×४·३″ )

०५९·१४६/म. ज्ञा. प.

आगस्ट १८६३ पासून फेब्रुआरी १८६६ पर्यंतचे एकूण १४ अंक.

२१७ ... ...—शाळांतील मुलांकरितां चवथें पुस्तक. आवृत्ति चौथी. मुंबई एक्श्रेंज छापखाना, १८६३. पृष्ठें २+४+१९२. ( ८·६″×५″ )

४९१·४६८६/ च. पु.

२१८ ... ...—शिक्षापद्धति, भाग दुसरा. मुंबई, एक्श्रेंज छापखाना, १८६३. पृष्ठें २+७२. ( ७·१″×४·२″ ) ३७०·१/ शि. प.

ख्रिश्चन व्हर्नाक्युलर एज्युकेशन सोसायटीनें ख्रिस्ती धर्मतत्त्वांचे व नीतिविषयक शिक्षण देण्याच्या उद्देशानें हें पुस्तक तयार करविलें.

२१९ **आगाशे, परशुराम** ( भाषांतरकार )–विष्णुसहस्रनाम याचें भाषांतर. मुंबई, ज्ञानदर्पण छापखाना, शिळाछाप, १८६३. पृष्ठें ४+१+६० ( ८·८″×५·९″ ) २९४·२७२४१७/ आ. प.

विष्णुसहस्रनामांतील प्रत्येक नाम घेऊन शंकराचार्यांच्या आधारें त्याचा अर्थ स्पष्ट केला आहे.

२२० **कँडी,**(मेजर)**टी**–भूगोलाचें वर्णन. भाग पहिला. मुंबई, इंदुप्रकाश छापखाना, १८६३. पृष्ठें १४+२८४+१. ( ८·५″×५·५″ )

९१०·/ कँ. टी.

शालेय पाठ्यपुस्तक म्हणून हा ग्रंथ लिहिला आहे. यांत भूगोलाचें सामान्य ज्ञान व आशिया खंडाचें वर्णन एवढा भाग आलेला आहे.

२२१ **गोखले, विश्वनाथ महादेव**–हिंदुस्थानचा इतिहास ( कविताबद्ध ). पुणें, ना. आ. गोडबोले छापखाना, शिळाछाप, १८६३. पृष्ठें ४+१२६ +२. ( ९·३″×६·१″ ) ८९१·४६१/ गो. वि. म.

बाळशास्त्री जांभेकर यांच्या इतिहासग्रंथावरून या ग्रंथाची रचना केली आहे. पौराणिक कालापासून मोगल बादशाहीच्या अखेरपर्यंतचा इतिहास येथें सांगितला आहे. मुलांस उपयोगी पडावी म्हणून पद्यांमध्यें सोपी शब्दयोजना केली आहे.

२२२ **गोडबोले, परशुरामपंत**–कवितासारसंग्रह ( नवनीत, भाग दुसरा ).

पुणें, ज्ञानप्रकाश छापखाना, १८६३. पृष्ठें ४+१२६. ( ८·३″×५″ )
८९१·४६१/ **गो. प.**

नवनीत, भाग पहिला, लोकप्रिय झालेला पाहून हा दुसरा भाग तयार केला गेला. यांत ज्ञानेश्वरापासून रामजोशापर्यंत बहुतेक मराठी कवींच्या काव्यांतील वेंचे व कांहीं हिंदुस्थानी पदेंहि दिलीं आहेत.

२२३ **गोडबोले, रघुनाथ भास्कर**–हंसकोश. पुणें, नारो आपाजी गोडबोले छापखाना, शिळाछाप, १८६३. पृष्ठें ९+५६+२३०+२. ( ९·१″×६″ )
४९१·४६३/**गो. र. भा.**

या ग्रंथाच्या पहिल्या भागांत कांहीं कवींची माहिती, कवितांतील वेंचे व व्याकरण दिलें आहे. दुसऱ्या भागांत कठीण शब्दांचा कोश आहे.

२२४ **जांभेकर, बाळशास्त्री**–बाळव्याकरण. आवृत्ति चौदावी. मुंबई, बॉम्बे एज्युकेशन सोसायटीचा छापखाना, १८६३. पृष्ठें २४. (६·४″×३·९″ )
४९१·४६५/ **जां. बा.**

लहान मुलांसाठीं प्रश्नोत्तररूपानें लिहिलेलें व्याकरण.

२२५ **जोशी, गोविंद प्रभाकर**–लिपिधारा. आवृत्ति दुसरी. धारवाड, सन्मार्गदर्शक छापखाना, शिळाछाप, १८६३. पृष्ठें ५०. ( ७·३″×५·२″ )
४९४·८१४/**जो. गो. प्र.**

'मराठी आणि कानडी भाषा शिकणाऱ्यांसाठीं हें पुस्तक तयार केलें.' नागरी व कानडी मूळाक्षरें, बाराखडया, जोडाक्षरें क्रमानें समोरासमोर देऊन मराठी वाक्यें, उतारे व त्यांचीं कानडी भाषांतरें दिलीं आहेत.

२२६ **तात्याजी महिपती**–शनिमहात्म्य. पुणें, बुद्धिप्रकाश छापखाना, शिळाछाप, १८६३. पृष्ठें २+( ३१×२ ). ( ५·७″×४·२″ )
२९४·२३८/ **ता. म.**

शनि आणि विक्रम यांची सुप्रसिद्ध गोष्ट ओवीवृत्तांत सांगितली आहे. शेवटीं संस्कृत नवग्रहस्तोत्र दिलें आहे.

२२७ **दांडेकर, कृष्णाजी रामचंद्र**–वालिवध नाटक. अहमदनगर, वृत्तवैभव छापखाना, शिळाछाप, १८६३. पृष्ठें ४+७८. ( ६·४″×५″ )
८९१·४६२/ **दां. कृ. रा.**

रामायणांतील वालिवधाच्या आख्यानावरचें नाटक.

२२८ **नामदेव**—ज्ञानदेवाच्या समाधीचे अभंग. पुणें, बुद्धिप्रकाश छापखाना १८६३. पृष्ठें २+५०. ( ९·३″×६·४″ ) ८९१·४६१ ना.

एकूण अभंग ६६ आहेत.

२२९ **नारायण दाजी**—रसायनशास्त्र. मुंबई, इंदुप्रकाश छापखाना, १८६३. पृष्ठें १६+९+५४३. ( ८·५″×५·३″ ) ५४०·/ ना. दा.

ग्रँट मेडिकल कॉलेजच्या मराठी वर्गासाठीं पाठ्यपुस्तक.

२३० **माडगांवकर, गोविंद नारायण**—मुंबईचें वर्णन. मुंबई, इंदुप्रकाश छापखाना, १८६३. पृष्ठें २०+४०१+१+१ ( नकाशा ). (८·२″×५·१″) ९१५·४/ मा. गो. ना.

तत्कालीन मुंबईचें सविस्तर वर्णन १५ प्रकरणांत केलें आहे. एक नकाशाहि दिलेला आहे.

२३१ **मोरोपंत**—महाभारत, भाग १ ला. मुंबई, माधव चंद्रोबा छापखाना, शिळाछाप १८६३. ( ९·४″×६″ ) ८९१·४६१/ मो.

सर्वसंग्रहांतील पुढील पुस्तकें यांत एकत्रित केलीं आहेत:—आदिपर्व, १८६३, पृष्ठें २+२२२. सभापर्व, आवृत्ति दुसरी, १८६४, पृष्ठें २+५७. वनपर्व, आवृत्ति दुसरी, २+१५२. विराटपर्व, आवृत्ति दुसरी, १८६४, पृष्ठें २+६०. उद्योगपर्व, आवृत्ति दुसरी, पृष्ठें २+१२२. भीष्मपर्व, पृष्ठें ८० ( मुखपृष्ठ गहाळ ). द्रोणपर्व, आवृत्ति दुसरी, १८६७, पृष्ठें २+२३०.

२३२ **मोरोबा कान्होबा**—घाशीराम कोतवाल. पुणें ज्ञानप्रकाश छापखाना, १८६३. पृष्ठें ४+८+९+१९०. ( ९·७″×६·२″ ) ८९१ ४६३/ मो. का.

घाशीरामाच्याविषयीं प्रसिद्ध असलेल्या आख्यायिका दिल्या आहेत. त्यांतून सवाई माधवरावाच्या वेळच्या महाराष्ट्राचें व विशेषेकरून पुण्याचें किंचित् दर्शन होतें. पुस्तक सचित्र आहे.

२३३ **क्षत्री, जगन्नाथ विठोबा**—गोकर्णमहाबळेश्वराचे यात्रेप्रकरणी वृत्तांत. मुंबई. गणपत कृष्णाजी छापखाना, १८६३. पृष्ठें ८+६०+१. ( ७·६″×४·१″ ) ९१५ ४/क्ष. ज. वि.

गोकर्णमहाबळेश्वर व गोमतकांतील इतर क्षेत्रें यांच्या यात्रेचें वर्णन केलें आहे. हीं क्षेत्रें दाखविणारा नकाशा दिला आहे.

## १८६४

२३४ ... ...–मराठी ज्ञानप्रसारक (मासिक). पुस्तक पंधरावें, अंक १ ते १२. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८६४. ( ७·८″×४·९″ ) ०५९·१४६/प. ज्ञा. प्र.

२३५ ... ...–स्त्रीभूषण ( मासिक ). पुस्तक पहिलें व दुसरें, मुंबई, जॉइंट स्टॉक छापखाना, १८६४. ( ८·६″×५·५″ ) ०५९·१४६/स्त्रीभू.

डिसेंबर १८६४ व जानेवारी ते मार्च १८६६ असे चार अंक आहेत. स्त्रीजीवनविषयक लेख या मासिकांत येत असत.

२३६ **ओक, रामचंद्र विनायक**–मराठी लिहिण्याविषयीं अनुगम. आवृत्ति दुसरी. पुणें, बा. रा. ठकार छापखाना, शिळाछाप, १८६४. पृष्ठें ४+३४ ( अपूर्ण ). ( ५·८″×४″ ) ४९१·४६१/ओ. रा. वि.

या प्रतींत इंग्रजी मुखपृष्ठ व शेवटचीं आठ पानें गहाळ आहेत.

२३७ **गोडबोले, परशुरामपंत**–नवनीत. आवृत्ति पांचवी. मुंबई, ओरिएन्टल छापखाना, १८६४. पृष्ठें १२+३१६+३४. ( ७·९″×५″ ) ८९१·४६१/ गो. प.

२३८ **छत्रे, गोवर्धन लक्ष्मण**–गीतलिपी. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८६४. पृष्ठें ५+३९+१६. ( ८·३″×४·२″ ) ७८४·८/छ. गो. ल.

गायनाच्या व वाद्यांच्या स्वरलेखनाविषयीं माहिती व १६ आलेख या पुस्तकांत दिले आहेत. श्री. मंडलिकांनीं याचें संपादन केलें आहे.

२३९ **छत्रे, सदाशिव काशिनाथ** [ भाषांतरकार ]–वेताळपंचविशी. मुंबई, स. भि. खातु छापखाना, शिळाछाप, १८६४. पृष्ठें २+९४. ( ९·३″×६·२″ ) ८९१·४६३/ छ. स. का.

मूळ संस्कृत ग्रंथाच्या हिंदी ( व्रज ) भाषांतराचें हें मराठी भाषांतर आहे.

२४० **फडके, शंकर तात्या**–शिंद्याचे घराण्याचा इतिहास. मुंबई, इंदुप्रकाश छापखाना, १८६४. पृष्ठें ४+१११. (८·२″×५·५″) ९२९·/ फ.शं.ता.

'पुढें होऊं शकणाऱ्या मोठ्या पुस्तकाचा आराखडा असें या पुस्तकाचें **स्वरूप** आहे,' असें लेखकानें म्हटले आहे.

२४१ **बर्वे, रावजी धोंडदेव**—चंद्रहास्य नाटक. पुणें, ज्ञानप्रकाश छापखाना, १८६४. पृष्ठें ४+५४. ( ६·४″×४·४″ ) ८९१·४६२/ **ब. रा. धों.**

चंद्रहासाच्या कथेवर आधारलेलें नाटक. परशुरामपंत गोडबोले यांनीं शुद्ध केलें.

२४२ **मुक्तेश्वर**—कौतुहलनाटकरामायण, मुंबई, माधव चंद्रोबा छापखाना, शिळाछाप, १८६४. पृष्ठें २+१७३. ( ८·९″×६″ ) ८९१·४६२/**मु.**

'सर्वसंग्रहां'तून प्रकाशित.

२४३ **मोरोपंत**—श्री भगवद्गीता. मुंबई, माधव चंद्रोबा छापखाना, शिळाछाप, १८६४. पृष्ठें २+६४. ( ९·३″×६·२″ ) ८९१·४६१/**मो.**

'सर्वसंग्रहां'तून प्रकाशित.

२४४ **मोरोपंत**—सप्तशती. मुंबई, माधव चंद्रोबा छापखाना, शिळाछाप, १८६४. पृष्ठें २+३३. ( ९·३″×६·२″ ) ८९१·४६१/**मो.**

'सर्वसंग्रहां'तून प्रकाशित.

## १८६५

२४५ ... ...—मराठी ज्ञानप्रसारक ( मासिक ). पुस्तक सोळावें, अंक १ ते १२, मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८६५. ( ८·२″×५·३″ ) ०५९·१४६/**म. ज्ञा. प्र.**

२४६ ... ...—हिंदुशास्त्रांत सांगितलेलें ब्राह्मणाचें महत्त्व. आवृत्ति सहावी, मुंबई, ओरिएन्टल छापखाना, १८६५, पृष्ठें ६४. ( ७·२″×४″ ) २४३·२९४/**हिं. ब्रा. म.**

हिंदुशास्त्रांत व पुराणांत ब्राह्मणाविषयीं जीं विधानें आहेत तीं अतिरंजित कशीं आहेत ते उपरोधाच्या साहाय्यानें दाखविलें आहे. बॉंबे ट्रॅक्ट अँड बुक सोसायटीच्या मराठी प्रकाशनावलींतील क्र. २३ चें हें पुस्तक आहे.

२४७ **एक हिंदु**—जातिभेदविवेकसार. आवृत्ति दुसरी. मुंबई गणपत कृष्णाजी छापखाना, १८६५. पृष्ठें १०+१६+१७०. ( ८·३″×४·७″ ) **३२३·३/ ए. हिं.**

हें पुस्तक श्री. जोतिराव फुले यांनीं प्रसिद्ध केलें. धर्मशास्त्राधारें निरनिराळ्या जातींविषयीं विवेचन केलें आहे. जन्मजात उच्चनीचतेपेक्षां सदाचाराचें मूल्य अधिक आहे असा प्रतिपादनाचा रोख आहे.

२४८ **कीर्तने, विनायक जनार्दन**–जयपाळ नाटक. मुंबई, इंदुप्रकाश छापखाना, १८६५. पृष्ठें ९+९४. ( ७·८″×४·४″ ) ८९४·४६२/**की. वि.ज.**

हें नाटक वैशिष्ट्यपूर्ण आहे. प्रस्तावनेत ( ही इंग्रजींत आहे. ) नाटकविषयक विचार मांडले आहेत. हिब्रू कथेच्या आधारें हे नाटक लिहिलें आहे. या नाटकांत पद्यें नाहींत.

२४९ **गोडबोले, नारो आपाजी**–चमत्कारिक गोष्टी, भाग दुसरा. पुणें, ना. आ. गोडबोले छापखाना, शिलाछाप. १८६५. पृष्ठें १+१५९. ( ६·२″×४·४″ ) ८९१·४६३/**गो. ना. आ.**

भोज, कालिदास इत्यादि प्राचीन प्रसिद्ध व्यक्तींविषयींच्या कथांचा संग्रह.

२५० **चोभे, भिकाजी अमृत**–मानुष इंद्रियविज्ञानशास्त्र. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८६५. पृष्ठें १८+४५९. ( ८·५″×५·१″ ) ६१२·/ **चो. भि. अ.**

ग्रँट मेडिकल कॉलेजांतील मराठी वर्गासाठीं लिहिलेलें पाठ्यपुस्तक.

२५१ **जांभेकर, बाळशास्त्री**–बालव्याकरण. आवृत्ति पहिली. (?) मुंबई, वृत्तदीप छापखाना, १८६५. पृष्ठें २०. ( ६″×४·५″ ) ४९१.४६५/ **जां. बा.**

या प्रतीच्या मुखपृष्ठावर आवृत्ति पहिली असा उल्लेख आहे, परंतु तें वास्तविक नाहीं. पहिली आवृत्ति १८३६ मध्यें प्रसिद्ध झाली.

२५२ **तखंडकर, दादोबा पांडुरंग** ( संपादक )–श्रीमद्रामनंदन मयूरकविविरचित केकावलि. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८६५. पृष्ठें ४+६+२+५२+३८२+६+२. ( ७·६″×४·७″ ) ८९१·४६१/ **त. दा. पां.**

केकांची वर्णानुक्रमें सूचि, इंग्रजी व मराठी प्रस्तावना व यशोदापांडुरंगी नांवाची विस्तृत टीका या क्रमानें हें पुस्तक छापलें आहे. इंग्रजी मुखपृष्ठ व मधलीं दोन पृष्ठे या प्रतींत गहाळ आहेत.

२५३ **दीक्षित, लक्ष्मण गोपाळ**–रुक्मिणीहरण नाटक. पुणें, सापकर बंधु छापखाना, शिळाछाप, १८६५. पृष्ठें १४०. ( ९·१″×६·२″ )

**८९१·४६२/ दी. ल. गो.**

एकनाथाच्या रुक्मिणीस्वयंवराच्या आधारें रचिलेलें नाटक. एकनाथाच्या मूळ ओव्या कांहीं ठिकाणीं दिल्या आहेत. कांहीं चित्रेंहि आहेत.

२५४ **नातु, विनायक महादेव**–श्री. भिल्लीणी नाटक. मुंबई, बॉंबे एज्युकेशन सोसायटीचा छापखाना, १८६५. पृष्ठें ४+७८. ( ७·६″×५·२″ )

**८९१·४६१/ ना. वि. म.**

श्री. गणपत पांडुरंग कमळाकर यांनीं या नाटकाचें हस्तलिखित मिळवून छापविलें. शिवलीलामृतांतील चौदाव्या अध्यायाच्या आधारें हे नाटक रचिलें आहे.

२५५ **पंडित, विष्णु परशुरामशास्त्री** ( भाषांतरकार )–विधवाविवाह. मुंबई, इंदुप्रकाश छापखाना, १८६५. पृष्ठें १२+८+१५९. ( ७″×४·१″ )

**३९२·५/ पं. वि. प.**

ईश्वरचंद्र विद्यासागर यांच्या बंगाली व इंग्रजी ग्रंथाचें भाषांतर. धर्मशास्त्रदृष्ट्या पुनर्विवाह निषिद्ध नाहीं असें या पुस्तकाचें प्रतिपादन आहे.

२५६ **बापट, बाळकृष्ण लक्ष्मणशास्त्री**–विधवाविवाहखंडन. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८६५. पृष्ठें ६+२९+१०३. ( ७·७″×४·५″ )

**३९२·५/ बा.बा. ल.**

ईश्वरचंद्रांनीं घेतलेल्या धर्मशास्त्रांतील आधारांनीं विधवाविवाहाचें मंडन होत नाहीं हें दाखविण्याच्या उद्देशानें हा ग्रंथ लिहिला गेला.

२५७ **मोरोपंत**–मदालसोपाख्यान. मुंबई माधव चंद्रोबा छापखाना, शिळाछाप १८६५. पृष्ठें २+२९. ( ९·३″×६·२″ ) **८९१·४६१·/ मो.**

सर्वसंग्रहांतून प्रकाशित.

२५८ **मोरोपंत**–महाभारत. भाग दुसरा. मुंबई, माधव चंद्रोबा छापखाना, १८६५. ( ९″×६·१″ ) **८९१·४६१/ मो.**

सर्वसंग्रहांतील पुढील पुस्तकें यांत एकत्रित केलीं आहेतः—कर्णपर्व आवृत्ति दुसरी, १८६६, पृष्ठें २+२३७. शल्यपर्व, १८६३, पृष्ठें १+३४.

गदापर्व, १८६३, पृष्ठें २+६४. स्त्रीपर्व, १८६३, पृष्ठें २+३४. शांतिपर्व, १८६४, पृष्ठें २+४६. अनुशासन पर्व, १८६४, पृष्ठें २+५६. अश्वमेध पर्व, १८६४, पृष्ठें २+६०. आश्रमवासीक पर्व, १८६४, पृष्ठें २+४०. मौसलपर्व, १८६४, पृष्ठें २+१६. महाप्रस्थानिक पर्व, १८६४, पृष्ठें २+८. स्वर्गारोहण पर्व, १८६४, पृष्ठें २+११.

२५९ **साठे, कृष्ण प्रभाकर शास्त्री** ( भाषांतरकार )–पुनर्विवाहनिषेध. भाग पहिला. मुंबई, सर्वसंग्रह छापखाना, शिळाछाप, १८६५. पृष्ठें ४+२२७. ( ९·१″×६″ ) **३९२·५/ सा. कृ. प्र.**

काशींतील १४ पंडितांनीं पुनर्विवाहाचा निषेध करणारा ग्रंथ प्रसिद्ध केला होता, त्याचें भाषांतर.

## १८६६

२६० **गद्रे, गणेश दाजी**–हिंदुस्थानचें पद्यात्मक वर्णन. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८६६. पृष्ठें ४+५४. ( ६·४″×५″ ) **८९१·४६१/ग. ग. दा.**

मेजर कँडीच्या हिंदुस्थानचें वर्णन व भूगोल या दोन पुस्तकांच्या आधारें केलेलें हिंदुस्थानचें पद्यात्मक वर्णन.

२६१ **गोडबोले, नारो आप्पाजी**–चमत्कारिक गोष्टी. भाग तिसरा. पुणें, वृत्तप्रसारक छापखाना, शिळाछाप, १८६६. पृष्ठें १+१७२. ( ५·८″×४·३″ ) **८९१·४६३/गो. ना. आ.**

१८६५ सालीं प्रसिद्ध झालेल्या दुसऱ्या भागांतील गोष्टींप्रमाणेंच या पुस्तकांतही भोज, कालिदास यांविषयींच्या कथा दिलेल्या आहेत.

२६२ **गोडबोले, परशुरामपंत**—संक्षिप्त भूगोलवर्णन. आवृत्ति दुसरी. मुंबई, ओरिएंटल छापखाना, १८६६. पृष्ठें ८+१०० ( ८·″×४·५″ ) **९१०·/गो. प.**

मेजर कँडीच्या भूगोलवर्णन या पुस्तकाचा सारांश.

२६३ **गोडबोले, रावजी सदाशिव** ( भाषांतरकार )—हावर्डकृत दुसरें पुस्तक, भाग दुसरा याचा मराठी तरजुमा. आवृत्ति दुसरी. मुंबई,

गणपत कृष्णाजी छापखाना, १८६६. पृष्ठें ४+१४३+२.
( ६·२″×३·९″ )४९१·४६८६/ **गो. रा. स.**

२६४ **जोशी, रामचंद्र सदाशिव**—श्रीमद्भागवताची संक्षिप्त बखर. आवृत्ति दुसरी. मुंबई, केशव सदाशिवशास्त्री छापखाना, १८६६. पृष्ठें २+६+ स्कंधानुसार भिन्न. ( ९·३″×६·२″ ) २९४·२७२/**जो. रा. स.**

या पुस्तकाची पहिली आवृत्ति १८५४ सालीं प्रसिद्ध झाली होती.

२६५ **तळेकर, श्रीकृष्ण रघुनाथ**—संस्कृत व्याकरण. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८६६. पृष्ठें ४+१६+४६३+९+१० ( अपूर्ण ) ( ९″× ५·२″ ) ४९१·२५/ **त. श्री. र.**

विल्सनच्या संस्कृत व्याकरणाच्या धर्तीवर सुरुवात करून इतर व्याकरणांच्या साहाय्यानें मराठींत लिहिलेलें संस्कृत भाषेचें व्याकरण. नियमाच्या स्पष्टीकरणांसाठीं संस्कृत वाङ्मयांतील कांहीं उतारे दिले आहेत.

२६६ **तुकाराम**—तुकारामकृत अभंग. मुंबई, माधव चंद्रोबा छापखाना, शिळाछाप, १८६६. पृष्ठें २+७८४. (९·३″×६·३″ ). ८९१·४६१/**तु.**

सर्वसंग्रहांत प्रकाशित झालेले तुकारामकृत ३३२९ अभंग.

२६७ **तुकाराम**—तुकारामकृत अभंग, करुणापर. शिळाछाप, सन १८६६. पृष्ठें २+५० ( ७·४″×५″ ) ८९१·४६१/ **तु.**

तुकारामाच्या १६६ करुणापर अभंगांचा संग्रह. शेवटीं ज्ञानदेवकृत ११ टाटीचे अभंगहि दिले आहेत.

२६८ **देशमुख, गोपाळ हरि** ( लोकहितवादी )—निबंधसंग्रह ( प्रथमांश ). अहमदनगर, वृत्तवैभव छापखाना, शिळाछाप, १८६६. पृष्ठें ५ ते १०९० ( अपूर्ण ). ( ८·६″×५·५″ ) ०४०·/**दे. गो. ह.**

लोकहितवादींचीं प्रसिद्ध ' शतपत्रें, ' इतर कांहीं पत्रें व प्रभाकर, इंदुप्रकाश इत्यादि साप्ताहिकांत प्रसिद्ध झालेले लेख या पुस्तकांत एकत्रित करण्यांत आले आहेत. या प्रतींत पहिलीं ४+५+१ ते ४ हीं पृष्ठे नाहींत.

२६९ **बाबा पदमनजी**–शाळांकरितां महाराष्ट्र देशाचा संक्षिप्त इतिहास. मुंबई ओरिएंटल छापखाना, १८६६. पृष्ठें ४+६+८६ (६·३″×३·८″)
९५४·७/**बा. प.**

सन १२९५ ते १८१८ पर्यंतचा महाराष्ट्राचा संक्षिप्त इतिहास.

२७० **भिडे, विष्णु गोपाळ**–सातारचे श्रीमंत छत्रपति शिवाजी महाराज यांचे वंशाचा व प्रतिनिधी आणि अष्टप्रधान यांचा इतिहास. भोर, भोर छापखाना, शिळाछाप, १८६६. पृष्ठें ४+१४+२६२. (८·८″×६″) ९२९·/भि. वि. गो.

शिवशाही व पेशवाईंतील महाराष्ट्राचा इतिहास. सातारा दप्तर व इतर माहितीच्या आधारें सांगितला आहे.

२७१ **मोरोपंत**–ब्रह्मोत्तरखंड. मुंबई, माधव चंद्रोबा छापखाना, शिळाछाप, १८६६. पृष्ठें २+१००. (९·४″×६·२″) ८९१·४६१/मो.

'सर्वसंग्रहां'तील प्रकाशन.

२७२ **मोरोपंत**–मंत्रभागवत. आर्या. मुंबई, माधव चंद्रोबा छापखाना, शिळाछाप, १८६६. पृष्ठें ४+३२८. (९·७″×६·३″) ८९१·४६१/मो.

'सर्वसंग्रहां'तील प्रकाशन.

२७३ **लिमये, कुशाबा** (भाषांतरकार)–महाराष्ट्र देशाचें वर्णन आणि इतिहास यांचा प्रश्नोत्तरावलिरूप ग्रंथ, आवृत्ति नववी. मुंबई, ओरिएन्टल छापखाना, १८६६. पृष्ठें ७२. (५·७″×३·५″) ९१५·४/लि. कु.

या पुस्तकाची पहिली आवृत्ति १८४० सालीं प्रसिद्ध झाली होती.

२७४ **शामराव मोरोजी**–श्रीमत्सभा विजय. मुंबई, शिळाछाप, १८६६. पृष्ठें ३६. (६·२″×४·७″) ३२३·२/शा. मो.

प्रभु–ज्ञातीविषयींच्या वास्तविक वृत्तांताचें ज्ञान लोकांना व्हावें व चुकीचे ग्रह दूर करावे या उद्देशानें हा ग्रंथ लिहिला आहे.

२७५ **सुभानंतस्वामी**–भीष्मपर्व (ओव्या). मुंबई, माधव चंद्रोबा छापखाना, शिळाछाप, १८६६. पृष्ठें २+१९७. (९·१″×५·९″) ८९१·४६१/सु. स्वा.

'सर्वसंग्रहां'तील प्रकाशन.

## १८६७

२७६ ... ...–स्फुट ज्योतिष. रत्नागिरी, जगन्मित्र छापखाना, शिळाछाप, १८६७. पृष्ठें ४+३९. (७·४″×५·४″) १५९·९६१५३/ स्फु. ज्यो.

मुहूर्त, प्रश्न वगैरे ज्योतिषांतील विषयांवरील संस्कृत श्लोक व त्यांचे अर्थ दिले आहेत. श्री. जनार्दन हरि आठल्ये यांनीं हें पुस्तक प्रसिद्ध केलें.

२७७ **अभ्यंकर रघुनाथ शंकरशास्त्री**–विराटपर्व नाटक (पूर्व भाग). पुणें वृत्तप्रसारक छापखाना, शिळाछाप, १८६७. पृष्ठें २+१०२ (७·९″×५″) **८९१·४६२/ अ. र. शं.**

कीचक-वधाच्या प्रसंगावरचें सचित्र, गद्यपद्यात्मक दोन अंकी नाटक.

२७८ **गोडबोले, नारो आपाजी**–बाहारदानीष अथवा फारसी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टी. भाग दुसरा. पुणें, वृत्तप्रसारक छापखाना, शिळाछाप, १८६७. पृष्ठें २+१७६. (६·२″×४·३″) **८९१·४६३/ गो. ना. आ.**

२७९ **जनार्दन रामचंद्रजी** (प्रकाशक)—वेदांतसाराचें भाषांतर. मुंबई, एज्युकेशन सोसायटीचा छापखाना, १८६७. पृष्ठें ४+१८. (८·३″×५·५″) **१८१·४६/ ज. रा.**

सदानंदस्वामींच्या 'वेदांतसार' या १८६२ सालीं प्रसिद्ध झालेल्या संस्कृत ग्रंथाचें भाषांतर.

२८० **जो. बा. रा.**—ग्रीस देशाचा संक्षिप्त इतिहास. मुंबई, इंदुप्रकाश छापखाना, १८६७. पृष्ठें ४+११४+१. (६·१″×४·१″) **९४८·/ जो. बा. रा.**

मॅट्रिकच्या विद्यार्थ्यांसाठीं एका विद्यार्थ्यानेंच हें पुस्तक लिहिलें.

२८१ **दांडेकर, नारायणभाई**—वाचनमाला. पुणें, ज्ञानचक्षु छापखाना, शिळाछाप, १८६७. पृष्ठें ६+१५२+१. (१०·५″×७·१″) **६५१·७/ दां. ना.**

सरकारी नोकरांना अर्ज, जबान्या, रिपोर्ट लिहिण्याची पद्धति घालून देण्याच्या उद्देशानें लिहिलेलें व मोडी लिपींत छापलेले पुस्तक.

२८२ **नेने, बजाबा बाळाजी**—गिलपीन चरित्र. कराची, भारतवर्षीय यंत्रालय छापखाना, १८६७. पृष्ठें ४+२८. (९·२″×६·२″) **८९१·४६१/ ने. ब. बा.**

कूपरच्या ' डायव्हर्टिंग हिस्टरी ऑफ जॉन गिलपिन ' या विनोदी कवितेचें आर्यावृत्तांतील भाषांतर. कवितेचा गोषवारा व मूळ इंग्रजी कविताहि दिली आहे.

२८३ **पाळंदे, भास्कर दामोदर**—रत्नमाला. अहमदनगर, खं. ना. फडके यांचा छापखाना, १८६७. पृष्ठें ८+९६ (अपूर्ण). (५·५"×३.८")
**८९१·४६१/पा. भा. दा.**

साकी, आर्या, अभंग इत्यादि वृत्तांतील भगवद्भक्तिपर कविता.

२८४ **प्रधान, माधव रामचंद्र**–दैवसेनी. मुंबई, इंदुप्रकाश छापखाना, १८६७. पृष्ठें ८+६३. ( ६·४"×४·५" ) **८९१·४६१/ प्र. मा. रा.**

जयपूरच्या इतिहासांतील प्रसंगावर साकी, दिंडी श्लोक इत्यादि वृत्तांत लिहिलेलें खंडकाव्य.

२८५ **भागवत, भास्कर हरि** ( भाषांतरकार )— इंग्लंडांतील प्रवास. मुंबई, युनियन प्रेस, १८६७. पृष्ठें ४०+५०२+३+२. ( ८"×५" )
**९१४·२/भा. भा. ह.**

श्री. करसनदास मूळजी यांच्या गुजराती ग्रंथाच्या दुसऱ्या आवृत्तीचें भाषांतर. हिंदुस्थान-इंग्लंड प्रवास, इंग्लंडमधील प्रेक्षणीय स्थळें व इंग्लिश संस्कृति यांचें फार बारकाईनें व पुष्कळ चित्रें देऊन केलेलें वर्णन.

२८६ **भागवत, रामकृष्ण हरि**–सायुज्यसदन नाटक. मुंबई, गणपत कृष्णाजी छापखाना, १८६७. पृष्ठें १२+३५८+४+६. ( ७·८"×४·३" )
**८९१·४६२/भा.रा.ह.**

आत्म्याचें मूलस्वरूप व देहधारणानंतरचे त्याचे व्यवहार व त्याला झालेले क्लेश दाखविणें ह्या हेतूनें हें नाटक लिहिलें आहे. मदाज ( मद ) लुभाजी ( लोभ ) अशीं नांवें पात्रांना दिलीं आहेत. या प्रतींत इंग्रजी मुखपृष्ठ गहाळ आहे.

२८७ **भाटवडेकर, कृष्णशास्त्री**–सुबंतप्रकाश. मुंबई, इंदुप्रकाश छापखाना, १८६७. पृष्ठें ११२ ( अपूर्ण ). (८·३"×५·२" ) **४९१·२५/भा.कृ.**

संस्कृत व्याकरणांतील नामप्रकरणावर मराठींत केलेलें विवेचन.

२८८ **मालवणकर, गणेश बापूजी**–लेखनकला. मुंबई, मालवणकर छापखाना, शिळाछाप, १८६७. पृष्ठें २+८८+४०. ( ८·९″×५·८″ )

**४२१·७/मा.ग.ना.**

मि. मलहॅासर यांच्या इंग्रजी लेखनाच्या अध्यापनपद्धतीनुसार या ग्रंथाची रचना केली आहे. मूळ इंग्रजी पुस्तकाची प्रस्तावना व तिचें मराठी भाषांतर प्रारंभीं दिलें आहे. शेवटीं इंग्रजी अक्षरांचे कित्ते दिले आहेत.

२८९ **मुक्तेश्वर**–महाभारत. मुंबई, माधव चंद्रोबा छापखाना, शिळाछाप, ( ८·९″×६″ ) **८९१·४६१/मु.**

सर्वसंग्रहांत प्रकाशित झालेलीं पुढील पुस्तकें यांत एकत्रित केलीं आहेत. आदिपर्व, १८६५, पृष्ठें २+३८६. सभापर्व, पृष्ठें २+२४८ ( मुखपृष्ठ गहाळ ). विराटपर्व, १८६७, पृष्ठें २+८१. 'वनपर्व' सर्वसंग्रहांत प्रसिद्ध झालें नाहीं.

२९० **मुळे, रखमाजी देवजी**–हिंदुशास्त्रांतील संख्यावाचक दुर्बोध शब्दार्थ कोश. मुंबई, सिटी छापखाना, १८६७. पृष्ठें २+१०२. ( ६·८″×५″ )

**४९१·४६३/ मु. र. दे.**

हिंदु धर्मशास्त्रांत कांहीं शब्दांना संख्यादर्शक विशिष्ट अर्थ असतात. अशा शब्दांचा ० ते १०८ या अनुक्रमानें केलेला संग्रह.

२९१ **मोरोपंत**–विराटपर्व. आर्या, आवृत्ति दुसरी. मुंबई, अमरापूरकर छापखाना, शिळाछाप, १८६७. पृष्ठें २+६० ( ९″×६·२″ )

**८९१·४६१/ मो.**

२९२ **राजमाचीकर, त्र्यंबक नारायण**–चमत्कारिक न्यायाच्या व अकलेच्या गोष्टी. भाग पहिला, मुंबई, जगद्हितेच्छु छापखाना, शिळाछाप, १८६७, पृष्ठें ८+२०६. ( ६·१″×४·१″ ) **८९१·४६३/रा. त्र्यं. ना.**

बिरबल बादशहाच्या पन्नास गोष्टींचा संग्रह. प्रथम मराठींत गोष्ट देऊन नंतर तिचें उर्दूंत ( लिपि-नागरी ) भाषांतर दिलें आहे. कठिण उर्दू शब्दांचे अर्थ परिशिष्टांत दिले आहेत.

२९३ **वामन पंडित**-श्लोक. भाग चौथा. मुंबई, माधव चंद्रोबा छापखाना, शिळाछाप, १८६७. पृष्ठें ४+४७३ ते ७१९. ( ९·४″×६·४″ )

**८९१·४६१/ वा. पं.**

या पुस्तकांत गीतार्णव, चरमगुरुमंजिरी, वामनचरित्र, द्वारकाविजय, विश्वासबंध, दंपत्यचरित्र, ब्रह्मस्तुति, भरतभाव, रुक्मिणीपत्रिका व सीता-स्वयंवर इतकीं प्रकरणें आहेत. हें ‘ सर्वसंग्रहां ’तील प्रकाशन आहे.

---

## विशेष सूचना

१८३८, १८४१, १८४६ या वर्षांचे आंकडे त्या सालच्या मुद्रितांच्या आरंभीं वर घालावयाचे राहिले आहेत.

पुस्तकावर जेथें केवळ शकच दिला असेल अशा ठिकाणीं शकाच्या आंकड्या-मध्यें ७८ मिळवून सन काढला आहे व त्या सालांत तें पुस्तक दाखविलें आहे.

# परिशिष्टें

## (१) विषय-दर्शिका

### ( ड्युइ वर्गीकरणपद्धतीप्रमाणें )

आंकडे मुद्रितांचे क्रमांक आहेत.

## (२) मुद्रणस्थलदर्शिका

प्रसिद्धि–स्थल किंवा मुद्रणालय यांसंबंधीं कांहींच उल्लेख नसलेल्या मुद्रितांचे क्रमांक:—४८,११०, १५६,१८२,२६७. प्रसिद्धिस्थलांचा उल्लेख आहे. परंतु मुद्रणालयाचा उल्लेख नाहीं, अशींही कांहीं मुद्रितें आहेत. तीं येणेंप्रमाणें:– नाशिक:—२६, ३७, पुणें १५, १८, २७४, मुंबई ५, ६, ७, ९, १२, १६, २२, २५, २७, २८, ३२, ३८, ३९, ४४, ५०, ६८, ८४.

### अहमदनगर

खं. बा. फडके छापखाना—२८३.

वृत्तवैभव छापखाना— २२७,२६८.

### कराची

भारतवर्षीय यंत्रालय, २८२.

### कोल्हापूर

ज्ञानप्रसारक छापखाना—१५५.

### पुणें

नारो आपाजी गोडबोले छापखाना—२२१, २२३, २४९.

नारो रामचंद्र ठकार छापखाना—१४६, १४७, १९४.

पुणें पाठशाळा छापखाना—१०६, ११२, १२४, १२५, १३४.

बा. रा. ठकार छापखाना—१७९, १९०, २३६.

बुद्धिप्रकाश छापखाना—२२६, २२८.

विश्रामबागवाडा छापखाना—४७, ६०, ७४.

वृत्तप्रसारक छापखाना—२६१, २७७, २७८.

सरकारी शाळाखातें छापखाना—१९, ५३.

सापकर बंधु छापखाना—२५३.

ज्ञानचक्षु छापखाना—२८१.

ज्ञानप्रकाश छापखाना—७८, ७९, ९२, ९४, १९१, १९७, २१२, २१६, २२२, २३२, २४१.

### भोर

भोर छापखाना—२७०.

## मुंबई

## रत्नागिरी



## श्रीरामपूर

## (३) ग्रंथकारनामदर्शिका

**पुढें दिलेल्या क्रमांकांच्या दोलामुद्रितांवर लेखकांचीं नांवें नाहींत.**

३, १४, १५, १६, १८, १९, २०, २१, २३, २४, ३२, ३५, ४५, ४८, ४९, ५३, ५६, ५८, ६३, ६६, ७४, ७५, ७६, ७८, ८३, ८७, ८९, ९०, ९१ १००, १०१, १०२, १०८, १०९, ११०, १११, १२१, १२२, १२३, १२८, १२९, १३०, १३१, १३२, १३८, १४०, १४१, १४२, १५७, १५८, १५९, १६३, १६४, १६५, १६६, १७६, १७७, १९४, १९५, २१६, २१७, २१८, २३४, २३५, २४५, २४६, २७६.

# ग्रंथसूचि-समिती

सॅा. मो. वि. जयकर, बी. ए., एलएल. बी., कार्याध्यक्ष

डॅा. पु. म. जोशी, एम. ए., पीएच. डी. ( लंडन ), समितीचे अध्यक्ष

प्रा. द. रा. घारपुरे, एम. ए. सभासद

श्री. ना. द. सामन्त ”

” वि. गो. फाटक, बी. ए., डिप. लिब., कार्यवाह

” ना. म. केतकर, बी. ए., डिप. लिब., सहकार्यवाह

ॲ. दि. पु. धुपकर, बी. ए., एलएल. बी., सभासद

श्री. आ. ग. राणे ”

” आ. स. सिधये ”

” बा. द. सातोस्कर, बी. ए. ”

सौ. इंदिरा कालेवार, एम. ए. ”

सौ. लीला भागवत, बी. ए, डिप. लिब. ”

श्री. ना. म. बापट, एम.ए., एलएल. बी. ”

” पु. वा. गांडेकर, एम. ए., डिप. लिब. ”

” वि. आ. भोंसले, बी. ए. ”

” शां. श. रेगे, बी. ए., डिप. लिब. ”

” र. पु. कर्वे, क्युरेटर ऑफ लायब्ररीज ( मुंबई प्रांत ) सभासद

” स. ल. कापडी, बी. एससी., मुख्य ग्रंथपाल, रॉ. ए. सोसायटी, सभासद

” के. गो. भट ”

” पु. ह. सहस्रबुद्धे, डिप. लिब., ग्रंथपाल, मुं. म. ग्रं. सं.